# DICTIONARY OF MARATHI PROVERBS.

# मराठी ह्मणींचा कोश.



हा ग्रंथ

गणेश नारायण देशपांडे तारळेकर

यांनीं

तयार करून

पुणें येथें

आर्यभूषण छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.







सन १९००.

# प्रस्तावना.

ईश्वरकृपेनें मजजवळ पंचाहत्तर हजारांहून जास्त ह्मणींचा भरणा आज बहुत वर्षांपासून आहे. परंतु पुस्तकरूपानें तो प्रगट करण्याचा योग कांहीं कारणामुळें आजपावेतों जमून आला नाहीं. अनुभवज्ञानाच्या विषयाइतका महत्वाचा दुसरा विषयच नाहीं हें जरी निर्विवाद खरें आहे तरी या विषयावर आज तागाईत म्हणण्याइतका मान्य ग्रंथ छापून प्रसिद्ध झाला नाहीं ही मोठ्या दुःखाची गोष्ट होय. प्राचीन काळापासून जगांत राज्य वगैरे संबंधाच्या ज्या उलाढाली झाल्या त्यांची माहिती होण्यास इतिहास, बखरी हींच काय तीं साधनें आहेत पण व्यवहारास उपयोगीं पडणारें असें अनुभवविकज्ञान प्राप्त होण्यास वृद्धवाक्यें, ज्याला आतां ह्मणी असें म्हणण्याचा प्रघात पडला आहे हेंच एक अत्युत्तम साधन आहे. अशा प्रकारचे विचार मनांत येऊन ग्रंथ छापण्याविषयींचा मी आपला हेतु प्रसिद्ध केल्यावरून ज्या कांहीं मागण्या आल्या त्या जरी फारच थोड्या आहेत तरी त्या सर्व मोठमोठे विद्वान, अधिकारी, राजदरबारांतील मुत्सद्दी वगैरे अशा पोक्त सुविचारी लोकांकडून आल्यामुळें मीं ग्रंथ छापविण्यास सुरवात केली. एक दोन फॉर्म झाले न झाले तोंच अलीकडील दोन चार वर्षांच्या हंगामाप्रमाणें येथें सांथीस सुरवात झाली यामुळें या कामास कांहीं दिवस टाळा घावा लागला, आणि एक दोन मुदती टळून गेल्या तरी ग्रंथ काय तो अर्धा झाला. आतां ग्रंथ संपूर्ण होईपर्यंत थांबावें तर ग्राहक निराश होतील ह्मणून झालेल्या निम्म्या पुस्तकासच पहिला भाग असें नांव देऊन त्यांत सुमारें ५००० ह्मणींचाच समावेश केला आहे. इतर कांहीं अडचणीमुळें ग्रंथाकडे चांगलें लक्ष देण्यास मन लागलें नाहीं या कारणानें ह्मणीसंबंधानें बरीच अव्यवस्था होऊन अशुद्धें तर फारच राहिलीं आहेत. प्रथम प्रयत्न कधींच चांगला वठत नाहीं, तरी हातीं घेतलेल्या कामाचा शेवट केला पाहिजे ह्मणून यथाशक्ति जसें झालें तसें पार पाडलें आहे. कोणत्याही महत्वाच्या कामांत मागची माहिती, अथवा कचेरींतील मुख्य कागदपत्रांत जसें Record ( फेरिस्त ), तसें जगांतील यच्चावत् प्रसंगाच्या पर्यवसानाचें परिज्ञान होण्यास वृद्धवाक्यें (म्हणी) हीं फार उपयुक्त होत. वाचक दोषांकडे न पाहतां ग्रहण करतील अशी मला पूर्ण उमेद आहे.

ग० ना० देशपांडे

ग्रंथकर्ता.

# नमुन्याचें पृष्ठ.

## म्हणींचा कोश.

श्रीमंताला हाय हाय, गरिबाला खाय खाय.

अंग्रेजी टोपी, जेम फेरवी तेम सिधी.

अगस्तीऋषीचा वायदा. [उडती.

अडती तेव्हां पडती, नाहीं तर टणटण

अन्यक्षेत्रे कृतं पापं पुण्यक्षेत्रे विनश्यति.

अनुभवावांचून कळत नाहीं, चावल्यावांचून गिळत नाहीं.

आगलें झालें मागलें, बोडकें नाचूं लागलें.

आगसतो तो मागसतो.

आनि पानी तथा लोनी.

आशका बाप, निराशकी मा, होतेकी बेहेन, न होतेका दोस्त, पैसा गांठ, जोरू साथ.

आषकका घर नाषक, रंडीका घर पूना, जिसकू न मिले उने मालेगांव धुलियेकू जाना.

उठा काका, तीन तुमचे आणि दोन माझे.

एक डोसी ने सो जोशी.

करीयो, कदरीयो, नदी न्हावा जाय, परमेश्वरे काळा कीधा गोरा क्यां थी थाय !

खायची गडबड हगायचा तडफडाट.

गरीब गाईनें मोडला गोठा आणि गुलाम गाईचा अस्करा मोठा.

गडंच सास्वडंचैव सास्वडंच गडंस्तथा.

गरीब घेर छिंकणी, राजघेर हुक्को, साधारण घेर बिडी, ने बेठा बेठा फुंको.

घीनो दोडियो अने दोडियोनो घी.

घे आपली नथ, मी नाहीं बाईल होत.

चोकंति विद्या, खोदंत पाणी.

चिकणी सुपारी, पिकलें पान, सोड म्हसोबा आमची आण.

चोरी शिकायची तर अफीण खा, लबाडी शिकायची तर जकातखात्यांत नोकरी कर.

छप्पन वखारी, भारी कुंची, हातीं न पडे पण नजर उंची.

छाया एटला छापरां, नळिया एटला घर, रांडी रांडो एम कहे के कुंवारा एटला वर.

छिंकणी छिकामणी, ने लुगडा लाजामणी, तपकीर ताजा, ने जेना हाथमां छिंकणी ते छत्रपति राजा.

छेल व्यसन छिंकणी, राजव्यसन हुक्को, गांडव्यसन तंबाखू ने पचापच थुंको.

जल देखी शुची उपजे, माला देखी राम, शास्त्र देखी ध्यान उपजे, नारी देखी काम.

जामातो दशम ग्रहः.

ज्याची नीति सुरेख त्याच्या तोंडी राख, पण ज्याची नीति खोटी त्याच्या तोंडीं तूप रोटी.

ज्याचें तोंड पाहूं नये त्याची गांड पाहण्याचा प्रसंग.

डाक्तराचें सरटिफिकीट, इंजनेराचें इष्टमेट आणि पोलिसाचा संशय.

तडकें तुटलें, मडकें फुटलें.

ताप म्हणे मी मायबाप.

तापी दर्शनें, रेवा स्मरणें, गंगा स्नानें आणि यमुना पानें.

तिथीशिवाय महिना नाहीं, कुणब्याशिवाय गांव नाहीं.

आई, आई, बाबा आला, तुला आला खेळवायला पण मला आला लोळवायला.

थोडा खाना पण बहु घिंमाणा.

दधि पंचमी, षष्ठी तेल, एकादशीला नागर वेल, द्वादशीला झालर खाय, तो नर निश्चय नरकी जाय.

दाताका मुख देखतां दुःख जनमना जाय, जम गंगाना नीर देखतां पाप सकळ धोवाय.

देव गया द्वारके, पीर गया मक्के, अंग्रेजना राजमा धेड मारी धक्के.

देश गेला, परदेश गेला, शीक माझी कहाणी (Water) वाटर ह्मणतां प्राण गेला, खाटेखालीं पाणी.

धूळ गांव धोलेरा, बंदर गांव बारा, कच्च्या गव्हांची रोटी, पाणी पिती खारा.

नकोरे नको जन्म तो रे भटाचा, कदां तृप्ति नाहीं सदा दीन वाचा. [लाथ.

न लागो पुत्राचा हात पण लागो डोंबाची

नवें तेव्हां सर्वे, जुनें आपला बा झवे.

पतिव्रता भूकी मरे, कसबीण खाई लाडू, गांडू घेला घोडे चढे, मरद खेंचे गाडुं.

बम्मनकी गई बछडी, रावणकी गई लंक, दोनो दुःख समान है, ओ राजा ए रंक.

मित्र ऐसा कीजीये के ढाल सरीखा थाय, सुखमां पीछा पड्या रहे, दुःखमा आगळ होय.

राजा भिकारी माझी टोपी नेली, राजा भ्याला माझी टोपी दिली.

रामनाम सबको कहे ठक ठाकोर और चोर, जिस नामने ध्रुव प्रल्हाद तरे ओ राम कछु ओर. [शोक नाहीं.

लग्नासारखा हर्ष नाहीं, मरणासारखा

शरम करी नरम आणि भरम करी गरम.

सज्जनकू सज्जन मिले घडे ग्यानकी बात दुर्जनकू दुर्जन मिले दो बुकी दो लात.

सुखसोने कुंभार जो चोर न ले वांकी मिथ्या.

सुज्ञ दुष्टाचे हातीं, सत्ता कांहीं न देती.

हलवायाचे घरावर ब्रह्मार्पण.

हात पाय काड्या ढेर वाढ्या.

हातपाय पोटीशीं, गांड परदेशी.

हडपला अग्नी आणि बळाची प्रीति हे क्वचित् फार वेळ टिकती. [गेलें.

हयगयीनें काम ठेविलें तें समजा व्यर्थ

हरभऱ्याच्या झाडावर चढणें.

हलकटपणें वागणें, डाग लावून घेणें.

हलके मनाचे ते अल्प संतोषाचे.

हा मी का तो मी.

हास्यवदनी असतो तो गुह्य झांकून ठेवतो.

हातावर तुरी देणें.

हाल गया, अहवाल गया, दिलका खियाल न गया.

हातीं घोडा धरून चालावें, थकल्यावर स्वार व्हावें.

हातीं आलें घ्यावें, थोर लाभा न धांवावें.

हुंडा घेऊन लग्न करणें, कंटक शय्येवर निजणें.

हेवु सुनु सु पेहेरीये जे कान तुटे.

हेव्यामुळें अंतकरणास दुःख आणि शरीरास यातना.

होतां राज्यक्रांती, होय द्रव्याची प्राप्ती.

होऊं नये कोणाची बायको व होऊं नये कोणाचा चाकर.

क्षणं चित्तं क्षणं वित्तं.

क्षमेसारखें शस्त्र नाहीं.

ज्ञानीसे ज्ञानी मिले तो रसकी लुटालूट,
ज्ञानीसे अज्ञानी मिले तो उलटी माथाकूट,
ज्ञानीसे ज्ञानी मिले वाह वात वात ओर बात,
गद्धासे गद्धा मिले वाह लात, लात ओर लात

# ह्मणींचा कोश.

## श्री.

श्रीमंत व भाग्यवान, यांस असावें ज्ञान.
श्रीमंत होणार होता पण कोंबडा पादला.
श्रीमंतां खोडी असती, विरळा सुधारून घेती.
श्रीमंतां फुलविती, द्रव्यापुढें नाचती.
श्रीमंतां बहु फुलवूं नये, गरीबाचा मनोभंग करूं नये. [ घडणें.
श्रीमंताची कन्या करणें, विषयभोग कष्टें
श्रीमंताची होते सोय, दीना देव सहाय होय.
श्रीमंताचें जळूं नये घर, तरुणाची मरूं नये बायको व वृद्धाचा मरूं नये पुत्र.
श्रीमंताचे हुकुमांत कांचन, गरीबाचें परस्वाधीन. [ माधान.
श्रीमंती आणि आदरमान, याहून बरवें स-

## अ.

अकलेचा खंदक.
अकलेचें मूळ विद्या.
अकलेनें काम होतें, बहुतां हातीं थोडें येतें.
अकलेहून विद्या जास्ती ओझ्याप्रमाणें वाढती. [ मिळाला.
अकल्पित पांगळ्याला दैवानें ससा
अकृत्रिमता ती सत्याची माता.
अकृत्रिम मित्रभाव तो जाणा उत्तम स्वभाव.
अक्कल ठेवा चांगली नाहीं तर होईल बावली.
अक्कल नाहीं पण मुलगा तर फार दाणा आहे.
अक्कल बडी का लक्ष्मी बडी.
अक्कलमंदोकी दूर भला.
अक्कलकी तोती उडगयी.
अकाळीं जें करणें, तें सर्व बिपरीत होणें.
अकाळीं जें फळ येतें तें लौकर गळून पडतें.
अखंड सुवासिन गांवचा उंबरठा पुजते.
अग अग म्हशी मला कोठें नेशी. [ वसे.
अगर्व्यासी भय नसे, सगर्व्यासी शत्रु शिरीं
अग्नि काड्यांनीं पेटतो, मोठ्या लांकडें विझतो.
अग्नि ज्वाळेवांचून, तैशी उत्कंठा ज्ञानावीण.
अग्नि न विझे कापसानें, क्रोध न शमे क्रूर भाषणें.
अग्नीशिवाय धूर, येत नाहीं वर.
अग्नी सारखा प्राणी शत्रुमित्र न जाणी.
अगुण सगुणा न छेडिती तरी सगुण उत्पन्न होती. [ घरीं पाणी भरी.
अगुणिया स्तव न करी, लक्ष्मी जरी त्याचे
अगोदर चारा मग चोंच.
अगोदर भुक्ति मग भक्ति.
अघटित वार्ता कोल्हें गेलें तिर्था.
अघव्या जोडला, पिढीचा मोडला बरोबर होत नाहीं.
अघाडीचा गेला वेळ, पिछाडी तरी संभाळ.
अचाट खाणें मसणांत जाणें.
अचाट बुद्धि आणि विलक्षण कल्पना.
अचाटबुद्धि चालवावी आणि बळेंच लक्ष्मी मागवावी.
अजगरका दाता राम.
अजब चीज, बघण्याला नाहीं रीघ.
अजाणतें असावें, पण वाईट नसावें.
अजून आंगठ्याला आग लागली नाहीं.
अटकळीचा फात्या.
अटकळल्या देवास दंडवत.
अटतावाल पिटतावाल वालवाल निसंतान.

अठरा गुणांचा खंडोबा.
अठरा धान्यांचें कडबोळें.
अठरापद्में दळ सांपडेना स्थळ.
अडकली गाय फटके खाय.
अडक्याची देवता सापिक्याचा शेंदूर.
अडक्याच्या बोहणीला टक्क्याचा गोंधळ.
अडक्याचा हत्ती पण पोसायाला नाहीं शक्ति. [ गळा फांसून घेतो.
अडचणीच्या कामांत पडतो तो आपला
अडपती नाहीं सासू दडपता नाहीं भाऊ.
अडला हरी गाढवाचे पाय धरी.
अडल्याचा सारथी भगवान.
अडल्याची काशी कोणी जावें तिजपाशीं.
अडवून कोणी धरिलें तरी काम न राहे त्याच्यामुळें.
अडाणी कुणबी दुप्पट रावे.
अडेल कोल्हें मंगळ गाय.
अडेलपण हट्टीपण अल्पबुद्धीचें लक्षण.
अति उदार तो सदा नादार.
अति गरीब आणि अति द्रव्यवान, ह्यांस बुद्धी देतां न घेत जाण. [ वाचयति.
अति चतुरो मम भर्ता स्वयेन लिखितं परे न
अति चतुरो मम भर्ता परेण लिखितं स्वयं न वाचयति. [ न वाचयति.
अति चतुरो मम भर्ता स्वयेम लिखितं स्वयं
अति तेथें माती.
अति पवित्रता मुसळ देवता.
अति परिचयात् अवज्ञा. [ त्याला.
अति भूक लागे ज्याला कालवणही नको
अति राग भीक माग, त्याहून राग देशत्याग.
अति रूपवती सीता ।
अति गर्वेण रावणः ।
अति दानात् बलिं बद्धः ।
अति सर्वत्र वर्जयेत् ॥ १ ॥
अति सर्व कोणतेंही उपयोगीं पडत नाहीं.
अति शहाणा त्याचा बैल रिकामा.
अति शोक धरी तें मूर्खत्व, शोक न करी तें निर्दयत्व. [ श्रीहरी.
अति साहसें युद्ध करी पण यश देणार
अति सुंदरपणा, कांचेपरी जाणा.
अति सुंदर जन्मा येती, तिजवर उड्या पडती.
अति सोंवळा तो ओंवळ्या खाय दाहट बायको निघूनि जाय.
अति सौंदर्य तेथें बहुधा अज्ञान.
अति प्रीति जेथें चालते तेथें अदावत वाढते.
अत्यंत निर्लज्ज असे तो प्रतिष्ठेनें दूर बसे.
अतिशय करणें, तें तर व्यर्थ घालविणें.
अतिशय भोग करिती, लौकिक आशा न धरिती.
अतिशय शोक अवकाशानें मारतो, अकस्मात् हर्ष त्वरित प्राण घेतो.
अतिशय शोक करणें देह मनाचा नाश होणें.
अर्थी दान महापुण्य, पात्रीं दान महापुण्य.
अधणांतले रडतात व सुपांतले हांसतात.
अधमाची कृती गरज शिकविती.
अधर्मानें ये मूर्खता, वेडेपणा धर्मनिंदा करितां.
अर्धांत्री दोर कापणें. [ पाहणें.
अधिक जिवंत राहणें, आधिक तमाशे
अधिक भक्ती विशेष फलश्रुति.
अधिक लोभातें धरितो वारंवार हारीस येतो.
अधिकार आल्यावरती मूळ स्वभाव प्रकट करिती. [ मनीं.
अधीर आणि अज्ञानी कपटी असती फार
अधींत गर्दी.
अर्धी टाकून सगळीचे मागें लागूं नये.
अर्धे हळकुंडांत पिंवळा. [ माहीत होती.
अर्धे आयु सरल्या अंतीं, त्याची किंमत
अनभ्यासे विषं शास्त्रमजीर्णे भोजनं विषं.
अनक्षर शहाणे असती, कधीं साक्षर मूर्ख ठरती.
अन्नछत्रांतील स्वयंपाक आणि वेश्येचें सौंदर्य पाहिजे त्यानें लुटावें.

अन्नछत्रीं जेवणें व मिरपुड मागणें. [णिलें.
अन्न कमी बहु मुलें, सुख देऊन दुःख आ-
अन्न ज्याचें खावें, त्याचें उणें काढावें .
अन्न तारी अन्न मारी अन्नासारखा नाहीं वैरी.
अन्न परब्रम्ह.
अन्न पाठीवर ठेवणें त्यापेक्षां बरवें खाणें.
अन्नमय प्राण, प्राणमय शक्ती, शक्तीमय पराक्रम. [पढतें.
अन्न मिळवितां येतें, पण जिरवितां कठीण
अन्न वस्त्र आणि पत, उद्योगानें होय प्राप्त.
अन्य गोष्ट नाहीं समजली तोंवरी पहिली चांगली.
अन्याय सांचले बोट ठेंचलें.
अन्यायोपार्जित तें ( धन ) सत्वर नासुनि सुखा लया नेतें. [ लो बहु विघ्नताच.
अनंत शास्त्रं बहुलाश्च विद्या, अल्पश्च का-
अनाथाचें रक्षण ईश्वराधीन.
अनाथावर कृपा, करावी हा मार्ग सोपा.
अनायासें व्हावा काळ ऐसें मागें वेळोवेळ.
अन्नाचा मारेल खालीं पाही व तरवारीचा मारेल वर पाही.
अनुचित कर्माची प्राप्ती तीच शरीरास विकृती
अनुपकारासारखा, दुसरा नाहीं फटका.
अनुभव आणि लीनता वागवी भय मर्याद-शीलता.
अनुभव आपला आपण घ्यावा त्यापेक्षां दुसऱ्याचा पाहून शिकावा.
अनुभव पटे, संशय फिटे. [शतमूर्ख जाण.
अनुभव मूर्खा शिकवी, ज्ञान न शिके तो
अनुभवाची साउली, तीच विद्येची माउली.
अनुभवानुसार, चातुर्य तें वाढतें फार.
अनुभवावीण करणें, तीं मूर्खाचीं लक्षणें.
अनृणी अप्रवाशी तो सुखी. [ न घडे तरी.
अनेक कल्पना मनीं करी, त्याचें एकही सत्य
अनेक लहान, होती महान. [पदोरा.
अनोखिके हाथ कटोरी, पायी पीयी मुही

अपकार विसरावे, उपकार स्मरावे. [जाय.
अपकारास उपाय काय, अपकार विसरून
अपकारीं उपकार करणें. [नुकसान.
अपकारीं देतां उत्तेजन, तेणें होय दुर्जे
अपकीर्ति झाली असतां, कठीण पडती सुधारतां.
अपकीर्ति झाली जनीं, तो अर्धा मेला मनीं.
अपकीर्तीस भिणें तर अपकार न करणें.
अपकीर्तीनें वांचणें, याहून बरें मरणें.
अपघात करून धन मिळे, पण उत्तम मान गळे.
अपना वही तो आपने काम आवे.
अपना रख पराया चख.
अपने घर दूरसें सुझतां है.
अपने नयन आवाके दूर दूर मागे भीक.
अपमान अपकीर्ति, हे उघड ठकाचे सोबती.
अपमानापासून धिःकार, धिक्कारापासून नाहीं विसर.
अपयशानें जगणें, याहून बरवें मरणें. [ ती.
अपराध आणि वयोमिती, सर्व थोडींच सांग-
अपराध कबूल केला, म्हणून अर्धा दोष गेला.
अपराध नसतां कांहीं क्षमेचें कारण नाहीं.
अपराधाची क्षमा करी, मनांतलें न जाय तरी.
अपराधाच्या ओळी, नाहीं दिसत कपाळीं.
अपराधीं सूड न घेणें, त्वरित क्षमा करणें.
अपराध्यांची मंडळी तीच रक्षणीक टोळी.
अपराध्यास नाहीं शासन हेंच त्यास आश्वासन.
अपराध्यास शासन हेंच दुसऱ्यास शिक्षण.
अपरिक्षितातें सर्व सोपें वाटतें.
अपहार बुद्धी ती लोभाची वृद्धी.
अप्पलपोट्या गंगाळ उपट्या.
अपापाचा माल गपापा जायचाच.
अपाय करून घेणें, मग उपाय शोधणें.
अपायीं उपाय करावा त्यापेक्षां तो होऊं न द्यावा.

अपात्रीं आदर मान, टिकतांना कठीण.
अपात्रीं बक्षीस करणें, अनुपकार करून घेणें.
अपूर्व वस्तु घरीं, ठेवतां कठीण भारी.
अपेक्षा जयाची हातीं तें न येतें ।
निजावें तरी झोंपही दूर जाते ।
दुजा सेवणें मान्य त्या होत नाहीं ।
मनुष्यांस हीं बांचवीती न पाही ॥ १ ॥
अफूची गुटी अंधळ्याची मिठी.
अबतो पत्थरके नीचे हात दबाहै.
अब्रू घेऊन जातें, तें प्राणावर येतें.
अबोलका दिसतो तो खोल घातक असतो.
अभागी धैर्यवान क्वचित् होतो. [ ळतें.
अभाग्य मासळी ते गळी मांस सदा मि-
अभ्यास करील त्याची विद्या, जपेल त्याची लक्ष्मी, खपेल त्याचें शेत.
अभ्यास सारणी विद्या. [ ळस वाढतो.
अभ्यासें अभ्यास वाढतो, आळसानें आ-
अभिमान आणि अज्ञान, तरुणपणीं नासाडी जाण. [ नम्रता.
अभिमान कार्याकारितां, धरितो वारंवार
अभिमान वैरी वाढवी, मित्रजना दूर करवी.
अभिमान स्वदोष लपवितो, दुजयाचा प्रकट करितो. [ लाग.
अभिमानाचे मागोमाग, द्वेष करतो पाठ-
अभिमानें संकटें येती, दिमाखानें आशाभंग होती.
अमरसिंग तो मरगये भीक मागे धनपाळ, लक्ष्मी तो गोंवऱ्या वेंची भले बिचारे ठणठणपाळ.
अमर्यादेनें मौजा मारिती होय पापाची भरती.
अमित इच्छा न धराव्या, आपुले अंगीं जिरवाव्या.
अमोल काया जाईल वाया. [ पंडिताची.
अयुक्तवाणी धनवंताची, वंद्रिति निंदिती
अयुक्तं स्वामिनोयुक्तं, युक्तं नीचस्य दूषणं.
अयोग्यतेनें प्रतिष्ठा मिळविती ती अपराधाविना जाती. [ गांवठी.
अरण्य हंसिणीचे पोटीं पिलें होत नाहींत
अरिष्ट आलियावरी तत्क्षणीं प्रगट करी.
अरिष्टांत पडणें मग बुडणें किंवा तरणें.
अरिष्टांतून पार पडणें, तोचि जिवाचा लाभ होणें.
अरे माझ्या कर्मा कोठें गेला धर्मा.
अरे म्हटलें तरी तोंड वासतें आणि अहो म्हटलें तरी तोंड वासतें.
अरे तर कांरे, अहो तर कांहो.
अल्प अपराध करी, शासन होय त्या परी.
अल्प अपराध जरी घडे, केल्या चाकरीवर पाणी पडे.
अल्प असतां मोठें दिसे, सूक्ष्मदर्शक यंत्रीं जसें, वसे कीर्तीमाजी असें, जाणा तुम्ही स्पष्ट हो.
अल्प काम नाहीं होत, मोठे कामीं घाली हात.
अल्प कारण, खटला मोठा. [ मुका.
अल्प कार्यीं मारी हाका, मोठे कार्यीं राहे.
अल्प खाणें पिणें करी, मग जाणे नलगे वैद्याघरीं. [ ठी करी.
अल्प गुन्हा अल्प चोरी, करूं दिल्या मो-
अल्प डामर लागतां पीप न घालवी आलें हातां.
अल्प दुःखी मोठा खेद, मोठीं दुःखें होतीं बंद.
अल्प देणगी देणें, तेवढा उपकार घेणें.
अल्प दोष न सोडिती, क्रमें मोठेही करिती.
अल्प धन, थोर मन, नाश न होय स्वहित जाण.
अल्पधन बहु योजना, कारितां बुडती जाणा.
अल्प न्याय करितो तो मोठा सोडून देतो.
अल्प पीडा मनीं आली तरी मानी.
अल्प बुद्धि, मोठ्या मसलती, अर्थात करणारे फसती.

अल्पभाग्य अभिमान, त्याच गर्वें त्याचें मरण.
अल्प यत्नानें थोर काम होत नाहीं. [तापे.
अल्प मनुष्य बहु कोपे, लहान भांडें लौकर
अल्प लोभ दाविती ह्मातार ते न ठकती.
अल्प विद्या बहु गर्व. [राहे दूरी.
अल्पव्यसन न स्वीकारी, तर मोठें व्यसन
अल्प साधारण खाणें, नित्य आयुष्य वाढे तेणें.
अल्प संतोष हेंच धन, जगीं तोच एक जन.
अल्प ज्ञानी, मूर्खांत मोठा मानी.
अल्पाकरितां मित्रांसवें तंटा न करणें बरवें.
अल्पांत बरा सल्ला, मोठा वाईट हल्ला.
अल्ला अल्ला करो खैर मांगो.
अल्ला का दिया शिरपर.
अल्लाची गाय.
अल्ला यार है तो बडो पार है.
अल्ला दोमेसे एक देवे तो कबूल है.
अवघड कामीं धांवतो तो संकटांत पडतो.
अवघड जागीं दुःख आणि जांवई वैद्य.
अवघा नाश झाल्यावरी मग उपाय काय करी
अवघा गल्ला दाणा, नसे कोंड्यावांचून.
अवघी गोष्ट ऐकल्यावरी, मनुष्याची परीक्षा करी.
अवघ्यांची मति एकसारखी नसती.
अवघें उडविल्यावरी पश्चात्ताप मग करी.
अवघें एका स्थानीं, ठेवूं नये कदा मानी.
अवघे कामांत थोडें जाणितो बहुधा तो उपयोगी नसतो.
अवघें जोडे सर्वांपायीं सारखे बसत नाहींत.
अवघें रक्षावें तें वाईट, सारें खर्चावें हें नसे नीट.
अवघें सोपें उद्योगानें, सर्व कठीण आळसानें.
अवकाश नाहीं मला, निमित्त हें सांगण्याला.
अवलादीचें शिंगरूं अवलादीवरच जातें.
अवशीं खाई तूप आणि सकाळीं पाही रूप.
अवसानघातकी महापातकी.
अवसान सोडूं नये.
अवळा देऊन कोहळा काढणें. [नाहीं.
अवळा पिकायचा नाहीं, समुद्र सुकायचा
अविचारें ओझें घेणें, शांतपणें तें साहणें.
अविचारें नको मानूं, हट्टें नको अपमानूं.
अविचारें न्याय करी, पश्चात्ताप पावे तरी.
अविद्वानाचे हातीं शहाणे शिकूनियां जाती.
अविश्वास हें नव्हे ज्ञान सर्वपरी मूर्खत्व मान.
अविश्वासानें बचाव विश्वासानें पस्ताव.
अविश्वासें व्यवहार साधे विश्वासें परमार्थ लाधे.
अशक्त असतांना काम न होय जाणा.
अशक्त जातो कुडापावेतों.
अशक्त, दुर्जन, गांडू आणि कुरी.
अशक्ताचे शत, बाळियाचा एक हात.[मनीं.
अशाश्वत् मनुष्यांनीं, शाश्वत् क्रोध न ठेवणें
अशी लेंक हवई, घरोघर जांवई.
अष्टपुत्री मेहुणी कुत्री.
असंच म्हणगे म्हातारे घर घेतलें मेल्यानें.
अस्वलाचे गांडीस शष्पांचा दुष्काळ.
अस्वलाआधीं कीक फोडावी, पाण्याआधीं वळण बांधावें.
अस्सल नाग असेल तो चावत नाहीं, कम अस्सल असेल तो चावतो. [तरी.
अस्तमान होय तोंवरी न कळे काय होईल
असतां उघडें मागील दार, होती चोरी आणि परद्वार.
असतां उद्योगी जन, त्यास कधीं नसे चैन.
असतां एक प्राणी, बहु कल्पना मनीं.
असतां काळी कोंबडी, घालितसे श्वेत अंडीं.
असतां कोणी ठक, न ह्मणे मी आहें ठक.
असतां खरी स्तुति, समूळ विस्तारती. [लत.
असतां खालीं हात, मनुष्याचें नाहीं चा-
असतां चतुष्कर्णी, गुह्य न राहे जनीं.[भरी.
असतां चांगला हुन्नरी, सर्व ठिकाणीं पोट

असतां चांगली अघाडी होती बरवी पिछाडी
असतां चांगली दोस्ती, अभिमानानें बिघडती.
असतां तरुण कोंबडें,तया नावडे कोंडवाडे.
असतां तारुण्याचा भर काळ व्यय उत्तम कर.
असतां थंड प्रकृती, भावना चांगली राहती.
असतां दिवसाची चलती, सर्व कामें चांगलीं होतीं. [ रींदारीं.
असतां पतिव्रता सुंदरी, तिचा प्रकाश घ-
असतां पूर्वी ताकीद, राहवें सदा सावध.
असतां पैशाची पूर्णता, नसे मित्रांची न्यूनता.
असतां मांजर अंध, उंदीर होतो धुंद.[मस्त.
असतां यजमान सुस्त, सेवक होतो खाऊन
असतां लहान घट, दिसतो जाड कांठ.
असतां लहान, थोरा अडवी जाण.
असतां वय लहान, बोल मोठे जाण.
असतां सर्व गुणसंपन्न, एक तरी राहतो दुर्गुण.
असतां सळईइतकें भोंक, बरमा जाईल देख.
असतां सूर्याचें तेज, दीपापुढें निस्तेज.
असतां संपत्ति लीन व्हावें, विपत्ति काळीं धैर्य धरावें.
असतांना निर्धनीं, थोर इच्छा धरी मनीं.
असतांना दैव बरें, बुडवितांही न मरे.
असति अभागी आणि अशक्त, त्याची हेळणा करणें न उक्त.
असत्याचा बाप नसत्याची आई.
असत्याचे विकार, नसत्याचे घोरंकार.
असतीं मुलें लहान परी त्यांचे तीक्ष्ण कान.
असतील फळें तर होतील बिळें.
असतील शितें तर मिळतील भुतें.
असते कडू मात्रा जरी, बहू चांगले गुण करी.
असले नसले न गणी, तो एक सुखी प्राणी.
असा कुणबी हाव्या तर वाटेवर लावी काव्या.
असाध्य असल्या बरी, कार्यीं प्रयत्न न करी.
अस्सी की आदा, चौरसीका खर्च. [करी.
असुनि द्रव्य आपले घरीं, गाढवा परी भोग
असून द्रव्य गांठीं न खाय पुरते पोटीं.
असे जी प्रशस्त रीति, तिजला सोडवण असती.
असेल माझा हरि तर देईल बाजेवरी.
असंगाशीं संग प्राणाशीं गांठ.
अहद, दर्या तहद सूर्य.
अहमदकी पगडी महमदके शिरपर.
अहो बुद्धीचे योगानें नम्र क्रोधास करणें.
अहंमकसे बडीबात, काडो जुत्ता तोडी दांत.
अहंकाराचे मुळें ज्ञान्यास लागे खुळें.
अहंकारें करणें पण, हें मुर्खाचें लक्षण.
अहंभाव मनीं धरिती, पोकळपणा घेऊन उठती.
अळवाची खाज अळवास ठाऊक.
अक्षय भोग कुडच्याचीं फुलें.
अज्ञान आणि गुप्त गोष्ट नाहीं राहत एकवट.
अज्ञान लोभास घाली, पडूं नको त्याच्या ख्यालीं.
अज्ञानस्य मनुष्यस्य वर्त्म तद्दर्शितः शुभं.
अज्ञानाचा त्याग करी, तीच ज्ञानाची पायरी
अज्ञानानें क्रोध येतो, पुढें पश्चात्तापानें जातो.
अज्ञानामुळें, पीडा वेळोवेळे.
अज्ञानास न प्रकाश भ्रांति दावी त्याचा वेष.
अज्ञानास न होय प्राप्ती करितांही खरी भक्ती.
अज्ञानी ते पशूवत, भिन्न काय ते आकृतींत.

## आ.

आई गेली देवाला, देव आला घराला.
आई जेऊं घालीना बाप भीक मागूं देईना.
आई जेवली म्हाळसा पावली. [ अली.
आई तेली बाप माळी बेटे निकले सुजान-
आई देवळांत व नायटे गांवांत.
आई निघुनिया जाते, करडूं मागें लागतें.
आई भेरी, बाप पडघम आणि संबळ भाऊ.
आई मला बाळंत व्हावयाचे वेळेस जागी कर, बाई तूं मुलखास जागें करशील.

आई मुलाची तहान भूक जाणती त्यापेक्षां मुलाला अधिक माहिती.
आईसारखी माया, निंबाची छाया.
आईचें दूध कीं गाईचें दूध.
आईच्या लाडामुळें मूल होई खुळें.
आईनें टाकलें ह्मणून देव टाकीत नाहीं.
आईबापें जन्माचे मात्र सोबती पण कर्माचे सोबती नाहींत. [ पडती.
आईबापाची कीर्ती मुलाचे उपयोगी न
आईबापाची लाडकी, महाजनांची बोडकी.
आऊचा काऊ तो ह्मणे माझा मावसभाऊ.
आकृतिरेव गुणावगुणान् कथयति.
आकारे रंगती चेष्टा.
आकाश खालीं येतें तर पक्षी हातीं येते.
आकाश गडगडे पाणी पडे.
आकाशाची कुऱ्हाड कोल्ह्याचे दांतावर.
आखका अंध और गांठका पुरा.
आखांत तट्टू, भाद्व्यांत भट्टू.
आखुड शिंगी बहु दुधी अल्प मोली.
आंखे होते चार, दिलमे आया पियार.
आखों मे खाक डाल आये.
आग पाणी अवश्यक पण मित्राहून अधिक.
आगपानीको हाडवैर है.
आग लगाये पानीको दोडती.
आग लगाये तमाशा देखे.
आग लगते झोंपडी जो निकलेसो लाभ.
आग लगे पर कुवा खोदना.
आगला गिरे पिछला हुशार.
आगलाव्या आणि बोंबमाऱ्या [ जसा.
आगलीचा असा तसा मागलीचा गुलाम
आगलीला मिळेना चोळकें, मागलीला उकरी बोळकें.
आगस्ताळी गांव जाळी.
आगीवर तेल. [ रडें नाहीं.
आगी वांचून कढ नाहीं व माये वांचून
आगींतून निघाले, व फुफाट्यांत पडले.
आगीवांचून धूर येत नाहीं.
आगे आगे गोरख जागे. [ असती.
आचरतां दांभिक भक्ती, दोहीकडून खरी
आज आहे सुवर्णकांती, उद्यां होय तिची माती.
आजचे अरिष्टा उपाय उद्यां केल्यानें न होय.
आज करणें तें उद्यांवर न टाकणें.
आज चांगलें तर उद्यां कामास येईल.
आज मला तर उद्यां तुला.
आज मरा, उद्यां धर्म करा.
आज संपादून घ्यावें उद्याचें कोणी पहावें.
आज है सो कल नही.
आजचें कामकाज, उरकून घ्यावें आज.
आजा मेला नातू झाला, जमाखर्च सारखा झाला.
आजाला नातू शिकवितो.
आटखोर आट करी आवडता मार्ग धरी.
आटलें सोनें कमी नसे, मैत्रिकीचें लक्षण तसें
आठ पुरभय्ये आणि नऊ चौके.
आठ हात लांकूड व नऊ हात ढलपी.
आठ हात कांकडी नऊ हात बीं. [खाऊं.
आडभावाचे साडभाऊ येरे कुत्र्या कण्या
आडवे गात ना उभे गात, रस्त्यानें चालला गाणें गात.
आडवें आलें तर कापून काढावें.
आडांत नाहीं तर पोहऱ्यांत कोठून येईल.
आडांतला बेडूक.
आडून गोळी मारणार. [ यला.
आण केली वाहायला भाकर केली खा-
आण पायली करूं दे वायली.
आणखी मीया मंगता, बहार खडे दरवेश.
आत्मपरीक्षा करी, ती औषधापरी.
आत्मबुद्धी असे, तेथें प्रीति न ठसे.
आत्महितातें पाहतां, तंटा उत्पन्न करितीं.
आत्महित हा धर्म, आत्मनाश हा अधर्म.
आत्मस्तुती ही द्वेषाची जाती.

आत्मस्तुतीचा बांका नको फुंकूं फुका.
आत्मानं सततं रक्षेत्, दारैरपि धनैरपि.
आत्मा एव आत्मनः शत्रुः
आतां उगेच चावत चावत गिळा.
आत्याबाईला मिशा असत्या तर काकाच म्हटलें असतें.
आतेका नांव सहजा, जातका नांव मुक्ता.
आदमीका सैतान आदमी है.
आदराशीं प्रत्यादर शठ देखोन शाठ्य कर.
आदाय थोडा खर्च मोठा, मग लाथांस काय तोटा.
आदाय पाहून खर्च करावा.
आदित्यवारीं लग्न, सोमवारीं या.
आदौ वेश्या ततो दासी पश्चात् भवति कुंटिणी आणि नंतर वैदीण.
आद्यापेक्षां खर्च मोठा, त्याचा होई सदा तोटा.
आधीं आननं मग तननं.
आधीं आपलें घर भरावें मग पाहिजे तेथें [ जावें.
आधीं कडू मग गोड.
आधीं करावा विचार मग करावा संचार.
आधीं करावा वाचे स्वीकार, मग कां करावा तिरस्कार.
आधीं करावी उधळपट्टी मग पडावें संकटीं.
आधीं पाहावें तोलून मग दाखवावें बोलून
आधीं पिसा त्याचे हातीं दिलें कोलीत.
आधीं पोटोबा मग विठोबा.
आधीं बुद्धि जाती मग वैभव जातें.
आधीं शिंदोरी मग जेजुरी.
आधीं होता वाघ्या मग झाला पाग्या, त्याचा येळकोट राहीना, मूळ स्वभाव जाईना.
आधींच उल्हास त्यांत फाल्गुनमास.
आधींच तारें त्यांत गेलें वारें.
आधींच नाचरी त्यांत पायीं बांधली [ घागरी.
आधींच पिचकें, त्यांत दांत विचकें.
आधींच सोन्याचे त्यांत जडावाचें.
आधेल्याचें मनीं आदित्यवार.
आधेल्यावर धोंडा कोणी तरी टाकील.
आनंदमय वृत्ति मैत्रीवांचूनही राहती.
आनंदाची घडी येती, नकळतां निघून जाती.
आपआपणा न वर्णावें जनें आपणा स्तवावें.
आप करे सो काम पल्लो होय सो दाम.
आपकाज महा काज.
आपघर कीं बापघर.
आप डुबा तो जग डुबा.
आप भला तो जग भला.
आप मुवा विना काई सरग जवाये.
आपण कमाऊन आणावें, सोयऱ्याचें घर भरावें.
आपण करूं एक प्रारब्ध घडवी अनेक.
आपण झाला खोटा कुटुंबाला लावला बट्टा.
आपण दुसऱ्याला सहाय्य केलें तर दुसरा आपणाला करील.
आपण नागवी म्हणे पाहणारे लबाड.
आपण बुडून दगड दुसऱ्यास बुडवितो.
आपण भीक मागतो, तो दुसऱ्या काय देतो.
आपण मेलें आणि जग बुडालें.
आपण यजमानाशीं वागावें तसें सेवकास [शिकवावें.
आपण लोकांशीं तसे लोक आपणाशीं.
आपण विईना आणि सवत साहीना.
आपण व्हावें ऐसें ह्मणतो, ईश्वर इच्छी तैसें करतो.
आपण स्वस्थ बसणें परक्या श्रम देणें.
आपण हांसतो लोकांला शेंबुड आपल्या नाकाला.
आपणा म्हणवी जो शहाणा तो पहिला [मूर्ख जाणा.
आपदि मित्रपरीक्षा.
आपना दाम खोटा परखने हारेंको किया [ बट्टा.
आपना चकर आपने हात है.
आपनी और निभायवांकीवही जाने.
आपने आपने ख्यालमे सबही मस्त है.
आपने छाचकों कोयी, खट्टा नाहीं कहता.

आपने बछडच्येके दांत कोसोंसे मालूम होते है.
आपने रान खेले और आपहीं लाजू मरे.
आपला अन्याय आपणास दिसत नाहीं.
आपला अपराध चुकवावया, दुजावर घालूं नको वाया.
आपला कोप परिहार तोच रिपुसंहार.
आपला गू आपणास घाणत नाहीं.
आपला तो बाब्या, दुसऱ्याचें तें कारटें.
आपला दामकुडा,वाण्याशीं कां करा झगडा.
आपला दाम खोटा, परक्याशीं झगडा मोठा.
आपला दोष आपणास वाटे, तर करणाराचें हृदय फाटे.
आपला दोष सोड मग दुजाची खोड काढ.
आपला नाश आपण न करावा.
आपला नाश संतोषानें कोणीच न करितो.
आपला स्वभाव आवरून धरी नाहीं तर करील तुजवर स्वारी.
आपला हात जगन्नाथ.
आपली आवड आपल्याला गोड.
आपली ओळख आपण धरतो तो आपणाला तुच्छ मानतो. [पेक्षां बरी.
आपली इच्छा हुकमी धरी ती ज्ञानवृद्धी-
आपली गाय दुसऱ्याचे वेल खाय.
आपली नुकसान कोणी केली तर ती न उगवावी ती चांगली. [मेला दिसतो.
आपली पत चालवितो तो जिवंत असून
आपलीं पापें आणि कर्ज, मनीं अधिक समज. [म्हणावी.
आपली प्रतिष्ठा सांगावी तीच अप्रतिष्ठा
आपली हानि जगाची मरमर.
आपली फजिती दुसऱ्याचें हंसूं.
आपलींच नखें आपणास विखें.
आपल्या अन्नांत आपण माती कालविणें.
आपल्या आत्म्याचें तारण, ईश्वरानें केलें आपल्या स्वाधीन.

आपल्या खाजे फळती,धन्याला दुभतें करती.
आपल्या खेंटरावर माया असते ती लोंकाच्या लेंकरावर नसते.
आपल्या गांडीखालचें गेलें मग त्यावर एक बसो कां दोन बसोत. [मजतो.
आपल्या गुर्भीत असतो तसें लोकांस स-
आपल्या चोडे पासली पडे.
आपल्याजवळ नाहीं म्हणजे जगांत नाहीं.
आपल्या ठायीं बसूं जाणें त्यास ऊठ कोण म्हणे.
आपल्या डोळ्यांतील मुसळ दिसत नाहीं पण दुसऱ्याच्या डोळ्यांतील कुसळ दिसतें.
आपल्या तोंडाभोंवतीं आपणच दिवा ओवाळून घेणें.
आपल्या पोळीवर निखारे कोण न ओढी
आपल्या दुष्ट गुणें आपल्याला करी उणें.
आपल्या हातीं जें करवे तें ईश्वरीं न हवालावें.
आपल्याची लाथ, परक्याची खेव. [वार.
आपल्यावर उपकार, जाहल्या स्मरावा वारं-
आपल्यावरून जग ओळखावें.
आपल्याला जें प्राप्त न होय त्याची आठवत करून काय. [राखणें.
आपल्यास आपलें करणें ईश्वरास सर्वांसि
आपलें अनहित करून, दुसऱ्याचें प्रसन्न न करीं मन.
आपलें अपराध स्मर दुसऱ्याचे विसर.[नाहीं.
आपलें आईला कोणीही डाकीण म्हणत
आपलें उकिरड्यावर कोंबड्याचा अभिमान.
आपलें काम आपण करणें, दुसऱ्याचेवर चित्त न देणें.
आपलें कार्य आपल्याला प्रिय.
आपलें खावें पण दुसऱ्यास भ्यावें.
आपले खावे वाल, दुसऱ्याकडून तोडून घ्यावे गाल. [हंसावें.
आपलें खुळें तर रडावें दुसऱ्याचें खुळें तर

आपलें गमवूं नये, दुसऱ्यावर दोष देऊं नये.
आपले गरजे गाढव राजे. [होऊन बसतो.
आपलें गुह्य ज्यास सांगतो त्याचा दास
आपलें घर आपल्याला दुरून दिसतें.
आपले घरचा खटला दुरून कळतो मनाला.
आपले घरापुरती, मूर्खाची समजुती.
आपलें जावें आपण चोर व्हावें.
आपले जिवाहूनि वस्तु अधिक मानी.[णें.
आपलें तें गोजिरवाणें लोकाचें तें लाजिरवा-
आपलें तें न राखवें दुसऱ्याचें तें न देखवें.
आपलें तें बापडें, दुसऱ्याचें तें कातडें.
आपलें तें मापलें, दुसऱ्याचें तें दुपापलें.
आपलें तोंड आपणास आरशावांचून दिसत नाहीं.
आपलें नसे जग हांसे.
आपलें नाक कापून दुसऱ्यास अपशकून.
आपलें नाहीं धड आणि शेजाऱ्याला कढ.
आपले पदर्वाप्रमाणें सर्व गुंतले असती क्रमानें. [ त्यांस हात घालावा.
आपलें पागोटें कांखेंत मारून मग दुसऱ्या-
आपले पायांचा प्रताप.
आपले पायांवरती, कुऱ्हाड मारून घेती.
आपले पंख चांगले, ऐसें ह्मणती कावळे.
आपलें बाळगून ठेवावें दुजाजवळ न मागावें
आपले बेतानें राहणें पुढील प्राप्तीवर न जाणें.
आपलें मत विचारल्याविना देऊं नये.
आपलें मन जिंकी, तो धन्य ह्मणावा लोकीं.
आपलें मन स्वाधीन नाहीं बंधनीं तो कदां न राही. [ जनीं.
आपले मनाचा जो धनी, तोच धनी स्वर्ग
आपले मनांतील गोष्ट करूं नको सर्वां प्रगट. [ सर्व जन.
आपले मालाचें वर्णन, करीत असती
आपलें वचन भंग करिती, तैसे लोक त्याशीं आचरती. [ प्यालें.
आपलें वासरूं दुसऱ्याचे गाईस प्यालें तर
आपले शत्रूपासून राहावें राजानें भिऊन.
आपले सत्यानें सदा भिऊन वागणें.
आपले स्तुतीचा डंका, आपला आपण वाजवूं नका.
आपलेच सामर्थ्यावरी उडी मारूं नको.
आपले हातानें आपले पायावर दगड पाडून घेणें.
आपले हातानें आपला नाश करणें.
आपले हातीं, धूळीस मिळती.
आपले हातीं माखतो, दुसऱ्यास पुसायास सांगतो.
आपलें हित करावें, दुसऱ्याचें केलें ह्मणावें.
आपले हितातें पाहतो तो अर्जवी असतो.
आब्रू गेल्यावरी परवा न धरी.
आब्रूची चाड सर्वांस आहे.
आभार मागणें ओशाळीत पडणें.
आभाळ गडगडण्याला भीत नाहीं तो सूप-फडफडण्याला काय भिणार.
आभाळ फाटलें तर ठिगळ कोण लावील.
आमची जात चांगली अशी काकांचीही बोली. [ मनांत आणिती.
आमची मती अधिक चालती, ऐसें सर्व
आमचे घरीं येऊं नका, आपलें घरीं जेऊं नका, उपाशीं पण राहूं नका.
आमंत्रण टाकून भीक मागणार.
आम्ही खावें प्यावें, जमाखर्च तुमचे नांवें.
आम्ही तुह्मी एक व कंठाळीला मेख.
आयजीच्या जिवावर बायजी उदार, घ्यां दिवा रात्रीं अंधार.
आयता गब्बू आणि पैसा ढब्बू.
आयनाचे बयना घेतल्या विगर जाईना.
आयत्या पिठावर रेघा ओढणें.
आयत्या बिळांत नागोबा.
आयत्यावर कोयता.
आयुष्य किंचित, विद्या असे बहुत.
आयुष्याची घडी व्यर्थ कदापि न दवडी

आयुष्याची शाश्वती थोडी, देहाची आशा सोडी. [ पावती.
आर्जवी एकत्र जमती मनी संतोष पोट-
आर्जवी करी आर्जव, नाहीं यजमानास्तव.
आर्जवि फुलवितो, तेणें यजमान नाचतो.
आर्जविकाचें भाषण, गोड मधुतुल्य जाण.
आर्जविकाचें लक्षण घातक शत्रु प्रमाण.
आर्जवी मंडळीहून आत्मप्रीती अधिकजाण.
आर्जवून भुलवी तो मित्र खरा भावी.
आरती या आणि आपडूं नका.
आरशांत पाहणाराचे तीन प्रकार—नर-वीर आणि वानर.
आरसे महालांत राहणें तर दगड न उडवणें.
आरोग्य तें तरुणपण, अनृण तें धनीकपण.
आरंभीं आशेचें सुख शेवटीं दुःख.
आरंभीं लज्जा करिती, निवारतां कधीं होती.
आलत धोय धोय जाय, आढ़त केवकर जाय.
आलस्य शरीर घटवितें, मनासही तें खातें.
आलस्यंहि मनुष्याणां शरीरस्थो महा रिपुः.
आला आरोप खऱ्यावर तरी तो नाहीं भिणार
आला रसी आणि खबरकर्मा.
आलीकडला कुडव पलीकडली खंडी मामाजी गेले उफराटे गांडी.
आली घडी ती तर धर, मिळणार नाहीं गेल्यावर. [ करावी.
आली घडी संपादावी उद्यांची चिंता न
आली मेजवानीला तर लावली कामाला.
आली हिंमत सदा मुलख.
आल्यागेल्याशिवाय सोयरेपण बुडतें.
आलीया भोगासी असावें सादर.
आल्यावरी विपत्ती, कळे मैत्री आहे किती.
आलें अंगावर घेतलें शिंगावर.
आलें उत्तर गुरूस चुकूं नये.
आले तसे गेले. [ होणें.
आलें दैवीं सहन करणें, गेल्यावरी मुक्त
आलें वारें गेलें द्वारें तें कोण आमचे मोयेरेधायरे.
आवजी आवजी आपणालाच नावाजी.
आवडता विचार जरी, पाहूनियां आचरी.
आवडतें व्हावें तर भलें असावें. [ नाहीं.
आवडीला चाड नाहीं, प्रीतीला विटाळ
आवडीला मोल नाहीं व प्रीतीला तोल नाहीं. [ ही माला.
आवडे सोन्याची शृंखला, खुपे फुलाची-
आवडेल तें खाय, पण चोरून न जाय.
आवर्षे कुत्ते पावसे लढ.
आवी मलवा तो बेसाडी दलवा.
आशा जनी नमती, छाती फुटूनियां जाती.
आशा दुजाची करितो, खाता पिता कधीं होतो.
आशा ठेणें, निराशा करणें.
आशा धरावी परमेश्वराची, निराशा धरावी इतरा जनांची.
आशाधारी मरतो निराश तो वांचतो.
आशा प्रीतीचें बंधारण आहे मनाच स्वाधीन.
आशा भंगें होतो दुःखी, आशा पुरता बहु सुखी.
आशा मेल्यावरी, कांहीं न राहे माघारी.
आशायाः परमं दुःखं, निराशाः परमं सुखं.
आश्वासन देतो तो बद्धक होतो.
आश्रयाविना, हिंमत खरी जाणा. [नाहीं.
आशेसारखें दुःख नाहीं निराशेसारखें सुख
आशेनें जाणें, निराशेनें येणें.
आपक अंधा होता है.
आषाढी आणि सण हकारी.
आसा मरे निरासा जीये.
आहारीं व्यवहारीं कदापि लज्जा न धरी.
आहे जातीनें वाईट, तो कोणाशीं नसे नीट.
आहारं द्विगुणं प्रोक्तं शय्याच कुचमर्दनं ।
नास्ति मानापमानंच धश्चोटं पंचलक्षणं॥
आहे जें सामर्थ्य, त्याहून नको व्यर्थ.

आहे तितक्यांत चालवी, सुखी आपणांस ह्मणवी. [ ठेवावें.
आहे त्यांतून थोडें घ्यावें, शेष राही तें
आहेवेचे मेले व खेळावयास गेले.
आळस आणि सुस्ती,लज्जा निराशा करिती.
आळस कुटुंबाचा वैरी. [ क्षीण.
आळस तो रोग जाण तेणें जीवित्व होय
आळस हेंच दुर्गुणाचें मूळ.
आळसाचें धारण तेंच दरिद्रास कारण.
आळसानें जो घेरतोतो मळ्यामागचा दिसतो
आळसामुळें भिकेचे डोहाळे. [ क्षीण.
आळसानें शरीर हीन, गंजानें लोखंड
आळशावर गंगापूर.
आळशाला गंगा व पाप्याला पंढरपूर
आळशाला विसांवा नाहीं व खादाडाला चव नाहीं.
आळशास त्रैलोक्याचें ज्ञान. [ खर्च.
आळशास दुणें काम व लोभ्यास दुणा
आळशी आणि दिवाळखोर त्याचें रडे सदा पोर. [ मृत्युप्राय.
आळशी जिवंत असून काय, जन्मवरी
आळशी लोकांस फुरसत, पुष्कळ असतांही किंचित.
आज्ञा पालन तें नीतीचें जीवन.
आज्ञा पालन बरी, उपकार वाटती भारी.

## इ.

इकडे आड तिकडे विहीर.
इकडे नहीं इकडे वही.
इकडे बोलणें नाहीं तिकडे चालणें नाहीं.
इकडे ये इकडे ये आणि माझ्या कपाळचें गंध पहा.
इच्छा आवरी खर्च थोडा करी.
इच्छा कमी ठेविती अगत्य थोडी लागती.
इच्छा बुद्धीविना आंधळी.
इच्छा सरळपणाची सरळ वाट ती नीतीची.
इच्छी परा येई घरा. [ शरण.
इच्छीना संसारीं तरण, न जाय गुरूशीं
इच्छिलेलें जर घडतें तर भिक्षुकांचे राजे होते.
इच्छिलेलें साधेल तर दरिद्र कां बाधेल.
इच्छे पुरतें खाणें, नियमित पिणें.
इजें, बिजें आणि तिजें.
इडापिडा जावो आणि बळीचें राज्य येवो
इडापिडा टळो, अमंगळ पळो.
इतना पका के बारसा थका.
इतरांचा गर्व पहावा आपले अंगीं न धरावा.
इतरांची बुद्धी ऐकावी तशी लोकां सांगावी.
इदरबी थप्पड उधरबी थप्पड.
इदंच नास्ति परं न लभ्यते.
इन मीन सव्वातीन.
इल्म सिखा लेनेका नहि सिखा देनेका.
इष्क आणि कस्तुरी कधीं दडत नाहींत.
इष्क आणि खोकला राहत नाहीं लोपला.
इष्क आणि धनीपणा जमत नाहींत.
इष्क जैसा समर्थास तैसाच तो गरीबास.
इष्क स्वसंतोषें घडे सांगण्यानें न जडे.
इष्क जैसा अंध तैसा असे द्वेषही अंध.
इष्टमित्र खरे असतां दूर बरें.
इष्टं धर्मेण योजयेत्.
इसळा इसळला, शेजारी पिसाळला.
इळा आणि भोपळा.
इळा मोडून खिळा करणें.
ईटके वास्ते मसजीद ढलानी.
ईटका घर माटी करना.
ईद मग रोजा. [ जाय.
ईश नसे ज्यास सहाय त्याचे श्रम व्यर्थ
ईश सर्वांकडे पाहे असें ह्मणून स्वस्थ राहे.
ईश्वर आरोग्य देतो वैद्य दस्तुरी घेतो.
ईश्वर अन्न पाठवितो मनुष्य त्याचा नाश करितो.

ईश्वर उत्पन्न करतो, पोषाख शोभा देतो, द्रव्यानें मान मिळतो, ज्ञानानें थोरपणा वाढतो.
ईश्वर करणी अगाध आहे.
ईश्वर कृपा ज्यावरी त्याचें शत्रु काय करी.
ईश्वर कृपा करतो तेव्हां सर्व वायुसवें पाऊस पाडतो.
ईश्वर असे साही तर दुःख होत नाहीं.[न टळे
ईश्वर इच्छेस जें आलें त्याचा नियम कोणा
ईश्वरस्मरण ठेवावें आणि क्षेम मागावें.
ईश्वर चराचरां तारक, पाठवून देतो अन्नोदक. [बांधतो.
ईश्वर जन्मास घालतो त्याचे पदरीं शेर
ईश्वर तारी त्यास कोण मारी. (अगर उलट)
ईश्वर मात्र असे पवित्र.
ईश्वर सत्वशील आहे अनंतकाळ टीर्घ राहे.
ईश्वराची प्रार्थना करावी भाग्यवेळीं, अनुकूळ होईल विपत्तिकाळीं.
ईश्वराचा खरेपणा पृथ्वीचा स्तंभ जाणा.
ईश्वराची चिंता करणें, वाईट कोणाशीं न आचरणें.
ईश्वराचें भय हाच ज्ञानाचा उदय. [उणें.
ईश्वराशीं सख्य ठेवणें तेणें आपलें काय
ईश्वरास ठकवूं पाहतो तो आपला आपण फसला जातो. [ होती अधार्मिक.
ईश्वरानें मनुष्या केलें सात्विक, स्वबुद्धीनें
ईश्वरानें मला न दिलें संतान तर भावास कां द्यावें पुत्ररत्न. [ सोडवावें.
ईश्वरानें मरण द्यावें किंवा तापत्रयांतून
ईश्वरी कल्याणापासून दुःख हरून होय सधन.
ईश्वरी कृपा शाश्वत, मानवी ती अशाश्वत.
ईश्वरी देणें वंदन करणें.
ईर्षा झांकत नाहीं.
ईर्षा मनीं धरणें मग हात वळविणें. [नाहीं.
इंगळ हातीं धरवेल पण हा हातीं धरवणार
इंगळाचें अंथरूण.
इंगा फिरे मुंगा जिरे.
इंग्लंड देश स्त्रियांचें सुखभुवन सर्वकाळीं होय घोड्याचें मरण.
इंग्रजी कायदा पगाराचा वायदा.
इंद्र बदलतो इंद्राणी एकच राहते. [आलें.
इंद्रियांस न जिंकलें त्यास स्वातंत्र्य न

## उ.

उकिरडा घोळी तरी फुंकून पाणी पितो.
उकिरड्यांची दैना बारा वर्षांनीं फिटते.
उखालिमे सर दबा धक्कोसे किया डर.
उखळामुसळाशीं गांठ पडली.
उखळांत घातली तर सात घाव चुकवील.
उखळांत डोकें घातल्यावर मुसळास कोण भितो.
उगवती सूर्यकिरणें न दिसती तारांगणें.
उगाच काळ घालवूं नये, जिवा बहु श्रमही देऊं नये.
उगीच मौन धरणें तें मौर्ख्य.
उघड झोंपा देत गाई. [ घात करी.
उघड शत्रू सावध करी पण गोडबोल्या मित्र
उघड शत्रुत्व पुरवतें गोंवरीची आग जाचते.
उघडा बोडका बाळ संतोष.
उघड्या डोळ्यांनीं प्राण जात नाहीं. [मेलें
उघड्यापाशीं नागडें गेलें सारी रात्र थंडीनें
उचकी ये तोंवरी, मूर्ख हांसे परोपरी.
उचलली जीभ कीं लावली टाळ्याला.
उच्चस्थानं वासः.
उजाडगांवीं वडवृक्ष.
उजू पण इळ्या इतका वांकडा.
उठ कीं पळ बाहेर.
उठतां लाथ बसतां बुक्की.
उठल्या गांवची पाटिलकी.
उठवळ सासू थाट जांवई.
उडत्या पाखराचीं पिसें मोजणारा.

उडदामाजीं काळेंगोरें कोठवर निवडावें निवडणारें.
उडच्या बरा पण पडच्या कठीण. [ मांजर.
उडाऊ आणि व्याजखोर, उंदरास जसें
उडाऊ रुप्याचे ताटीं जेवतो, शेवटीं बंदि-शाळेंत जातो.
उडाव्याचे हातीं, पैशाची माती.
उण्याला चुना ओंबतो.
उणें अधिक दंडण, हें पक्षपाताचें लक्षण.
उणें जपतें खुणेला, अंधळें जपतें डोळ्याला.
उतरंडीचा वाघ.
उतरंडीशीं पट्टा खेळणें.
उतरंडीला नसावी कळीं व वगांत नसावी नणंद ग्बळी.
उत्तम कळा उत्तम ज्ञान, नये विद्येवांचून.
उत्तम कीर्ति सुशोभित, सर्वां ठायीं प्रकाशित.
उत्तम तें मत घ्यावें, पण पुढाईत न व्हावें.
उत्तम देह मनोवृत्ती त्यांना प्रीति बिघडविती
उत्तम पाहतां फळ मन धांवतें तत्काळ.
उत्तम बोलावें, बरवें ऐकावें.
उत्तम मुलाची इच्छा करी, तिजमारखी दुष्ट नसे दुसरी.
उत्तम शेती पण धनी असावा खेतीं.
उत्तम शेती, मध्यम व्यापार, कनिष्ट चाकरी, निदान भीक, न मिळे भीक तर वैद्यकी शीक.
उत्तमस्य उत्तमं फलं.
उत्तमस्य क्षणं कोपः
उतावळा तो बावरा.
उतावळा नवरा गुडघ्याला बाशिंग.
उतावळी बावरी म्हाताऱ्याची नवरी.
उतावळीनें कबूल करणारे ते विलंबानें सिद्धीस नेणारे.
उतावळीनें धरती, नसावें तें ये हातीं.
उथळ पाण्याला खळाळी फार खोल नदीची गति मंदवार.
उथळ पाण्याला खळाळी फार व दुबळें माणसाला बढाई फार.
उद्यांवर काम न लोटावें हें उत्तम.
उद्योग इतकाच वैरी तो इच्छेचे विरुद्ध करी
उद्योग उघडा करूं जातीं, त्यांत लपून विघ्नें राहतीं.
उद्योग करी श्रमानें त्यास सर्व मिळे क्रमानें.
उद्योग करिती ते थोरी मिळविती.
उद्योग कर्ज करतो, निरुद्योग कर्ज वाढवितो.
उद्योग करितां फळें येती हातां. [ करी
उद्योग हीच किमया बरी, धातुमात्राचें सोनें
उद्योगाचा त्रास, करतो सदा आळस.
उद्योगाचे अंतीं भूषण आणि कीर्ति.
उद्योगानें मन स्वच्छ राहतें आळसानें मन खातें.
उद्योगानें सर्व सोपें आळसानें सर्व कठीण.
उद्योगानें सुख, रिकामपणीं दुःख.
उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मीः.
उद्योगी मनुष्य भागे, गाढ मूढ निद्रा लागे.
उद्योगाचे घरीं सुखें येती सामोरीं.
उद्योगी यासी मिळे अवकाश, आळशा न मिळेचि खास.
उद्योग्याचे घरीं, ऋद्धि सिद्धि पाणी भरी.
उद्योग्याचे घरीं, लक्ष्मी नांदे परोपरी.
उद्योग्याचे घरीं क्षुधा प्रवेश न करी.
उद्योग्याशीं ज्ञान केवळ त्यास भूषण.
उद्योग्यास रिकामपण, वाटे ओझ्याप्रमाण.
उद्योगें पैसा वाढतो, बसून खातां खुंटतो.
उद्योगः खलु कर्तव्यः फलं मार्जारवद्भवेत्.
उद्योगं पुरुषलक्षणं. [ विपत्तिवेळीं
उदार मन ठेव संपत्तिकाळीं, स्थीर असावें
उदाहरणानें शिकतो तसा उपदेशानें शिकत नाहीं. [ हात.
उदीम आणि खर्च मित श्रीचा डावा उजवा

उद्दीम करतां सोळा बारा शेत करितां डोईवर भारा. [केलें जाती.
उद्दीम व्यापाराचे अंतीं, रजावंतीनें ठ-
उधळ माधळ दिवसा गोंधळ.
उधळेपणानें घालवी तें काटकसरीनें जमवी.
उधळेपणाचा जन्म चमत्कार, भिकारी होऊन मरणार.
उधार आणि अंधार.
उधारीचें खातें सव्वा हात रितें.
उन उकरड्यावर पडलें म्हणून सूर्यास बाधत नाहीं.
उन्ह पाण्यानें घरें जळत नाहींत.
उन्हाळा जोगी, पावसाळा रोगी आणि हिंवाळा भोगी.
उन्हांतून करून येतो सुरापान, त्याचे क्रोधाचें नाहीं प्रमाण. [करी.
उन्हाळा आच्छादन करी पावसाळा प्रगट
उपकार करणें त्याची बढाई न सांगणें.
उपकार करावा हा धर्म, कोणाचा न घ्यावा तो उत्तम. [करावी फेड.
उपकार फेडतां वाटतो जड त्याची हळूंहळूं
उपकार मागले, ठेवा मनीं चांगले.
उपकार विसरतो, पण अपकार स्मरतो.
उपकार स्मरतां मैत्री चालती त्यावरून दुसरी जडली जाती.
उपकारापेक्षां अपकार ध्यानीं ठेविती फार.
उपकारी सांगेल तें खरें मानणें.
उपकारी यांस देणें हें व्याजाप्रमाणें.
उपकारीया लाभ होय, अपकारीया घडे अपाय.
उपट सूळ घे खांद्यावर. [काढणी.
उपड्या घड्यावर पाणी व बहिऱ्याजवळ
उत्पद्यंते विलीयंते दरिद्राणां मनोरथाः.
उपदेश ऐकणें, शिकावण घेणें.
उपदेश देणें व्यर्थ, मनां नाहीं भावार्थ.
उपदेश देतां येतो, पण बुद्धी देतां येत नाहीं.
उपदेश येतो देतां, आचरण दुजे हातां.
उपदेश म्हातान्यास, जेवीं औषध मेल्यास.
उपदेशानें मार्ग लागतो, दृष्टांतानें समज होतो.
उपभोग घेणें हें ईश्वरी देणें. [तो धनपाळ.
उपभोग घेतो त्याचा माल, संपादन करी
उपभोग घेतो त्याची लक्ष्मी संग्रहीं ठेवतां न पडे कामीं.
उपयोगी आणि सुंदर यांचें काम निरंतर.
उपरका धडभाई और नीचेका अलखुदाई.
उपवासी निजावें पण कर्जभरी न व्हावें.
उप्परतो ग्वूप बनी पण अंदरकी खूंणी राम जाने.
उपाधीपासून रहे दूर, पापापासून रक्षी ईश्वर.
उपाध्यास्तव करणें, आशा न धरणें.
उपाध्या होण्यास नलगे सायास. [ळतो.
उपाशी झोंपीं जातो तो सारी रात्र तळम-
उपास केला दोन रुपये फराळाला.
उफराटें करतो तो मूर्ख दिसतो. [सुचतो.
उभयपक्षीं अडचणी येतीं कांहीं उपाय न
उभ्या कुळंब्याचा संसार, पडल्या श्रीमंतापेक्षां थोर. [शा मोडी.
उभ्या श्रम देणगी थोडी हारदासाची आ-
उभ्यानें मुतावें आणि उपाध्यास पुसावें.
उभ्यानें यावें व ओणव्यानें जावें.
उभें कुसळ व आडवें मुसळ.
उमजला तर भिल्ल नाहीं तर कुत्रीचें पिल.
उरला पदार्थ वांचवी, पुढले साहित्या लावी.
उर्ध्वाय दिशे ब्रम्हणे नमः
उरीं केस माथा टक्कल.
उलट सुलट बोलणें नाहीं तसें समजणें.
उलटा चोर कोतवाला दंडी.
उलटिका पानि बुलंदी नही ज्याता.
उलटी बोडी मान मोडी.
उलट्या चोराच्या बोंबा. [वत करी.
उलटून पडली खरी म्हणती सूर्यास दंड-

उलथा पसा पालथा पसा माकडा तुझा संसार कसा.
उलभ्याची कणीक वाऱ्यानें गेली. [समान.
उल्हास आणि उदासपण अंतःकरणीं
उल्हास मनीं औषधावाणी.
उल्हासी ओंवी, संतापी शिवी.
उल्लुके भाई मशालजी.
उशिरानें उठे काम साठे.
उशीरानें उठतो आपल्या कामास मुकतो.
उष्टीं काढ म्हणे जेवले किती.
उष्टें खावें तुपाचे लालचीनें.
उष्ट्या हातानें कावळा हांकणार नाहीं.
उष्ट्या हातानें मारला नाहीं कावळा, मग कां जावें देवळा.
उष्ट्राणांच गृहे लग्नं गर्दभाः शांतिपाठकाः परस्परं प्रशंसंति अहो रूपं अहो ध्वनिः॥
उसकी टांग उसकी गलेमें.
उसताद बैठे पास, काम आवे रास.
उसने देऊन घालवितो, मैत्रिकी तोडतो.
उसवल्या दोरा घालावा, निसवल्याला काय करावें.
उसवल्या दोरा निसवल्या वारा.
उसांत जाऊन वाढे आणणें. [ऊं नये.
ऊंस गोड झाला, म्हणून मुळ्यांसकट खा-
ऊंस गोड मुळ्या सोड.
उसाबराबर एरंडाला पाणी.
उंच घरापेक्षां लौकिक थोर आहे.
उंच चढे तोंभी कुत्ता काटे.
उंच देशावर तुफाने वरचेवर.
उंच वाढला एरंड तरी काय होईल इक्षुदंड.
उंची पोषाक करी, बायका मुलें उपाशी मारी.
उंची वस्तु अल्प मोला, त्या राष्ट्रीं मोडती कळा.
उंट कोण्या ठायीं बसेल याचा नेम नाहीं.
उंट बडबडा तेही लादते है.
उंट बुडतो, आणि शेळी ठाव विचारते.
उंटावर बसून शेळ्या राखणें.
उंटावरचे शहाणे.
उंदूर बीलाडीनो मेल. [झटपट.
उंदरा एक बिळी वाट, असतां मिळती
उंदराचा जीव जातो, मांजराचा खेळ होतो.
उंदराचा सांपळा न ठेवी रक्तानें माखला.
उंदराच्या पोरानें लोखंडाशीं खेळूं नये.
उंदरांच्या चिवचिवीपेक्षां पक्ष्यांचा किलकिलाट बरा.
उंदराला मांजर साक्ष.
उंदरास बोलले गगनास लागले.
उंदरास दाखवावया भीति, लावूं नको घरास बत्ती.
उंदीर मावेना बिळीं त्याचें पुच्छ तृणपुळीं.
उंदीर मांजरा घराहून, येतो उपवाशी परतून.
उंदीर सांपळ्यांत पडे, लक्ष त्याचें मृत्यूकडे.
उंदीर स्वास घेती पळूनियां जाती.
उंदरीण आपले घरीं धनीण म्हणविती.
उयं वोर्चिने, उजागरो लेवो.
उंबर पिकलें आणि नडगीचे डोळे आले.
उंबर फोडून केंबर काढणें.
उंबराचें फूल. [रखीच.
उंबराचें फुलाची आणि तुझी भेट सा-

## ऋ.

ऋण काढून सण-लग्न करणें.
ऋणं कृत्वा घृतं पिब.
ऋण दिल्यावांचून फिटत नाहीं, आणि मरण आल्यावांचून सुटत नाहीं.
ऋण फिटेल पण हीण फिटत नाहीं.
ऋण, हत्या आणि वैर चुकत नाहींत. [चा.
ऋणी बंदा सावकाराचा, जामीन बंदा दोघां-
ऋणकर्ता पिता शत्रुः
ऋतु प्राप्त झाल्यावरी पतीची इच्छा लागे.
ऋतूंत ऋतू वसंतऋतू.
ऋषीचें कूळ आणि गंगेचें मूळ पुसूं नये

## ए.

एक अणी चुकली बारा वर्षांचा वायदा.
एक अपराध करी, दुसऱ्यावरी रागें भरी.
एक अपशब्द बोलावा, तसा दुसऱ्याचा घ्यावा. [ पले माथां.
एक अरिष्ट निवारितां दुजें न आणी आ-
एक असतां वळी, शंभराचे कान पिळी.
एक असतां हातीं पक्षी, झाडीं दोहोंचा लाभ लक्षी.
एक इष्काच्या अंतीं अनेक विघ्नें येतीं.
एक उद्यां म्हणे तर दिवस दुणें.[एका घरीं.
एक उंदीर दोघी मांजरी, नांदत नाहीं
एक एक बात नऊ नऊ हात.
एक कमावतो, दुसरा खातो.
एक करी अपराध, दुज्या लाविती बाध.
एक कहे लोहोके चुक खोवे, दुसरा बोले लडका ले गई चील. [ काळीं.
एक काम एके वेळीं, दोन्हीं नाहीं त्याच
एक खवळ्या मेंढा होतो,कळपीं रोग पसरतो.
एक गहू प्रकार बहू.
एक गोरी बहात्तर खोडी चोरी.[त्तर रात्रीं.
एक घटका निद्रा पूर्व रात्रीं, दोन घटका उ-
एक घर उणें तर दस घर पुणें.
एक घर रून तर दस घर पुंज.
एक घाव आणि दोन रुढे.
एक चोरी करितो शंभरावर आळ येतो.
एक टांचा समर्थी मारल्यानें नऊ टांचे वांचवितो.
एकटा जीव सदाशीव.
एकट्याची एक वाट.
एक ठेंच खाई तो बावन बीर होईल, बावन ठेंचा खाई तो गद्धा होईल.
एक ठोका लोखंडावर, दोन मारी ऐरणीवर.
एक ढेंकूण चावतो शंभराचा काळ होतो.
एक तवेकी रोटी कीया छोटी कीया मोठी.
एक ताटीं जेवणें आणि घांस मोजणें.
एक तिडीक दे आणि घरची धनीण हो.
एकदम अवघे सांगूं नका, अवघे एकदम करूं नका.
एकदम काम सारें, दिवसांत न होय पुरे.
एकदम शहाणपण, दाखवितां मूर्खपण.
एक दर बंदा हजार दर खुले.
एकदां दैव वांकडें, दुजे वेळीं फांकडें.
एकदां विटलें, मन तुटलें. [ दिन यहान.
एक दिन मेहमान, दोदिन मेहमान, तिसरे
एक दिवस पाहुणा, दुसरे दिवशीं पै, तिसरे दिवशीं अक्कल नाहीं.
एक दुदावतो पांखरें, दुजा जाउनीयां धरे.
एक देशी पडतो फशी. [ लाजिरवाणा.
एक दोन दिवस पाहुणा, तिसरे दिवशीं
एक धड ना भाराभर चिंध्या.
एक धोत्री महाक्षेत्री.
एक नन्ना म्हणती आलें दुःख निवारती.
एक नन्ना सौ दुःख हरे.
एक नूर आदमी दस नूर कपडा.
एकपट विद्या दसपट गर्व.
एक पाय वेश्याघरीं दुसरा पाय वैद्याचे घरीं.
एक पायरी चुकणें खालीं येऊन पडणें.
एक पाहुणा ह्मणजे घरदार पाहुणे.
एकपुती रडती, दुपुती रडती, सातपुती रडती आणि निपुती रडती.
एक पंथ और दो काज.
एक प्रीति लागती, दुजी विसरती.
एक बायकोची पाठ, पासोड्या तनिशें साठ.
एक बाजी और सब पाजी.
एक बाळंतीण आणि बारा सद्‌गुणी.[जुन्नर.
एक बोलेना बांदर, तर काय ओस पडेल
एक मच्छली सारी झीलको गंदाती है.
एक मताचें होऊन, करावें दुष्टांस शासन.
एक मारी उंडे, एक मारी मांडे.
एक मार्गीं मिळविणें, दुजे मार्गीं घालविणें.

एक मार्ने नै दिया आटा तो क्या भुका मरेगा बेटा.
एक मूर्ख आपले परी, बहू लोकांतें करी.
एक मेहनत करितो, दुजा फळ घेतो.
एक मेंढा पुढें चालतो त्यामागें दुजा जातो.
एक रात्र राहणें, गांव कांगे लहान. [मागें.
एक लबाडीच्या योगें, बहू येती तिच्या
एक लज्जां परित्यज्य सर्वत्र विजयी भवेत्.
एक लिखा और सब बका.
एक वर्ष दाईपणा, बहु वर्षे अशक्तपणा.
एक वाईट आचरतो, पाहून दुसरा करितो.
एक वेळ चट लागती ती प्रथा पडती. [धरी.
एक वेळ मूल पोळे जरी, अग्नीची भीति
एक वेळीं परद्वार, घडल्या करी निरंतर.
एक वेळीं दुःख होणें, दुजे समयीं सुख जाणें.
एक श्रमी द्रव्यास्तव, दुजा इच्छी कीर्ति-वैभव. [लविता.
एक शहाणा असतां दुजा कज्जा न चा-
एकशें बारा आणि एकाला नाहीं थारा.
एक शेर विद्या आली जरी, दहा शेर अ-क्कल लागे वरी.
एकसे दो भले.
एक सोनार व एक झारेकरी.
एक हाथ जिकर पर, एक हात फिकर पर.
एका अधणानें तुरी शिजत नाहींत.
एकाएकी विश्वासतो, तो पश्चात्तापास पावतो
एका कानानें ऐकावें, दुसऱ्या कानानें सो-डून द्यावें.
एका कानावर पगडी, घरीं रांड उघडी.
एका कामीं बहुजण, लागतां करिती घाण.
एका खांबावर द्वारका. [न साहे भार.
एका गव्हाच्या कणसावर, दों चिमण्याचा
एका घायें एकाचि मरे, लेख सर्वां वंशीं पुरे.
एका घावीं दोन तुकडे.
एका घोंवानें म्हातारी होत नाहीं.
एका ठायीं बसून जाणे त्यास ऊठ कोण म्हणे.
एकाचा रोग, अवघ्याचा भोग.
एकाचा नाश होतो, दुजा संतोष पावतो.
एकाची जळते दाढी, दुसरा पेटवूं पहातो विडी. [जळे चित्तीं.
एकाची हो करितां स्तुती, अभिमानी
एकाच्या युक्तीवर सर्वांच्या युक्त्या.
एका चुकी मागे, दुसरी लागे.
एकाचें घ्यावें, दुसऱ्यास द्यावें.
एकाचें जें अन्न होय, तें दुसऱ्याचें विषप्राय.
एकाचें जें जडभारी, दुजा जाणत नसे तरी.
एका जत्रेनें देव जुना होत नाहीं.
एका झऱ्यांतून पाणी न येत खारें गोडवणी.
एका ठायीं जडलें मन, दुजे ठायीं फिरतां कठीण.
एका ठायीं नाहीं भाव, देवा मला पाव.
एका ठायीं राहणें, त्याशीं वैर न करणें.
एका ठेचेनें न फिरे तर दुसराही पाय चिरे.
एका दगडानें दोन पक्षी मारणें.
एकादशीचे घरीं शिवरात्र.
एके दिवशीं ताशे हवाया झडती, एके दिवशीं घरांत नाहीं बत्ती.
एके दिवशीं तुप पोळ्या चळचळीत, एके दिवशीं बसला कण्याच गिळीत.
एके दिवशीं हत्तीवर अंबारी, एके दिवशीं पायीं निघाली स्वारी.
एका दिवसाचें सुख, त्याचें दुणें होय दुःख,
एका देवळांतलें तेल चोरून दुसऱ्या देवळांत दिवा लावणें.
एका दोन चांगले. [डती बऱ्या.
एका धनुष्यास दोन दोऱ्या उपयोगीं प-
एका धातूनें सर्वां निर्माण केलें पण एका सांच्यांत नाहीं ओतिलें. [शकून निका.
एका नागपुडींतून दोन शिंका, सहदेव म्हणे
एकानें गाय मारली म्हणून दुसऱ्यानें वा. सरूं मारूं नये.
एकापासून संतती, विभागी सारखे होती.

एका पिसानें मोर होणें.
एकापुढें दुसऱ्याचें स्तवन हें स्वार्थाचें लक्षण.
एका पुरुषाच्या दोन बायका, घरांत किरकिर करूं नका.
एका पुष्पाचा हार, न होय तें सार.
एकापेक्षां बहुमत, फार उपयोगीं पडत.
एका पैशाची खरेदी, दोन पैशांचा काढा.
एका पैशाची चोरी, करील रुपयांची तरी.
एका पैशाचें तेल, दोन पैसे हेल. [ बऱ्या.
एका म्यानांत दोन सुऱ्या, ठेवूं नको वाईट
एका माळेचे मणी, एकासारखे एक गणी.
एका माळेचे मणी, ओवायला नाहीं कोणी.
एका मांडीवर चौऱ्याऐंशीं आसनें.
एका मेघापासून, सूर्य जाय आच्छादून.
एका व्यसनास लागे, तेणें दोघांचें पोट भागे.
एका शितावरून भाताची परिक्षा. [ वणार.
एकास पळ म्हणणार, दुसऱ्यास पाठीस लावणार.
एका हातानें टाळी वाजत नाहीं. [वाणी.
एक्या जातीचे प्राणी, भितऱ्या बढाई खोरा
एकेका मनुष्या मति, भिन्न भिन्न असती.
एके काठीनें हांकणें.
एके वेळीं वाईट बरी, मनुष्य परिक्षा न करी.
एकोपि गुणवान् पुत्रो निर्गुणैश्च शतैरपि.
एकोहि दोषो गुणसंनिपाते.
एवी तेवी भर्गी देवी. [ ल्या पाहती.
एरवी मनुष्या न विचारती, लांछन लाग-
एवढीशी थट्टा भलभल्याला लावती बट्टा.
ऐकावें जनाचें करावें मनाचें.
ऐकून घेत नाहीं, त्याला सांगूं नये कांहीं.
ऐश्वर्य आल्यावरी, मनीं लीनता धरी.
ऐंशी तेथें पंचाऐंशी करगे रांडे पुरणपोळ्या.
ऐंशी ह्मण ऐंशी, मडम तुझी मावशी, साहेब तुझा काका.
ऐसे जगेपर बैठना कीं कोई न बोले ऊठ, और ऐशी बात बोलना कीं कोई न बोले झूट.

# ओ.

ओ म्हणतां ठो कळेना.
ओछे की पीत, बालू की भीत.
ओछेसे खुदा काम न डाले.
ओझें आहे ह्मणून वांटून घ्यावें.
ओझें उचल तर ह्मणे बाजीराव कोठें.
ओटी जड, पाहुणा गोड.
ओंठ फुटो किंवा खोकाळ फुटो.
ओंठांत एक आणि पोटांत एक.
ओंठाबाहेर तें कोटाबाहेर.
ओढा तरून जाणें आल्यास समुद्रपार पाडणारे भोपळे असावे.
ओलें जळतें आणि वाळलेंही जळतें.
ओसाड गांवीं एरंड बळी.
ओसाड गांवीं गाढव मुवासिनी.
ओहट भरती समान व्यवहार, सांभाळी द्रव्य भरती आल्यावर.
ओहोटीमागें भरती, भरती मागें ओहोटी.
आहोळ उडाला, कौल बुडाला.
ओहोळाला खळगा जामीन.
ओळखीचा चोर जिवें न सोडी. [ होतो.
ओळखीविना विश्वासतो, तो जन्मभर दुःखी

# औ.

और तर भुर. [ दखते.
औरकी फुली देखते, आपना टिंटर नहिं
औषध खावें म्यां आणि पथ्य करावें त्वां.
औषध नाहीं मृत्यूस कांहीं.
औषधावांचून खरूज गेली.

# अं.

अंगची शिंदळ तिला कुंटण कशाला.
अंगा वेगळा घाय तुला लागे मला काय.
अंगापेक्षां बोंगा मोठा.
अंगावर पडे दुणें बळ चढे.
अंगावर पडतां माल सोडवी त्याचें मुद्दल.

अंगास रक्त लावून घायाळांत घुसावें.
अंगीं असतां पराक्रम, करूं नये हलकें काम.
अंगीं न लागे चोरीचा ठाव तोंवरी चोर दिसे साव.
अंड म्हणतां उंबर आणि ससा म्हणतां अंड म्हणतां उंबर कळेना.
अंतकाळाहून माध्यान्हकाळ कठीण.
अंतरीं सद्गुण असतो, बाह्यात्कारी नसतो.
अंतःकरणाचा दिलासा तोच त्याचा आरसा.
अंतःकरणीं आणणें तेंच जिव्हेनें बोलणें.
अंतःकरणीं उपकार स्मरण हीच कृतज्ञता जाण.
अंथरूण पाहून पाय पसरावे, आढा पाहून खर्च करावा.
अंदाधुंद, मन हरा गाय.
अंदाधुंदी कारभार, झोटींग बादशाही.
अंधेके हात बटेर.
अंधस्य नृत्यं, बधिरस्य गीतं.
अंधा कीया जाने लालकी बहार.
अंधा देतां आमंत्रण, सवेंचि येती दोघेजण.
अंधा बाटे जोडीया, फिर फिर आपने नही को.
अंधेके आगे सेये, दोनो दिदे खोये.
अंधोके गांवमे काना राजा.

## आं.

आंधळा आंधळ्याला नेऊं शकत नाहीं.
आंधळी डोळा पाण्याला गेला तेथें बेटकुळीबाईनें तमाशा केला.
आंधळा दोन डोळे मागत नाहीं.
आंधळा पाहतां चांद, होय मोठा आनंद.
आंधळा मळी, रेडा खाई.
आंधळ्या कारण दीपाचें न पडे जाण.
आंधळ्या गांवांत लंगडी गाय प्रधान.
आंधळ्याचा हात ताटावर.
आंधळ्याची धांव कुडापर्यंत.
आंधळ्याचे मनीं सोमवार, पांगळा म्हणतो माझी बाईल गर्भार.
आंधळ्याचे खिला चट्टीपट्टी हवी कशाला.
आंधळ्या पांगळ्याला सहाय्य हो चांगला.
आंधळ्यापुढें लाविला दिवा आणि बहिऱ्यापुढें गाइलें गीत.
आंधळ्यास रात्र काय आणि दिवस काय.
आंधळ्यासारखा धीट, दुसरा नाहीं देख.
आंधळें दळतें कुत्रें पिठ खातें.
आंधळें नगर, चौपट राजा, टक्का शेर भाजी, टक्का शेर खाजा.
आंधळे मुला उपयोगी नातरी, आईबापा डोळे चांगले तरी.
आंधी पिसे, कुत्ता खाय.
आंधेरांत केलें पण उजेडांत आलें.
आंधेरांत धांवतो तो ठेकर खातो.
आंधारांत मांजरी येती, सर्वत्र सारख्या दिसती.
आंबे आले पाडा निंबुणी आल्या रसा.
आंबे आले पाडा ते गेले गडा.
आंब्यावर धोंडा मारून पाहूं, लागला तर लागला नाहीं तर नाहीं.
ॐफस्स.

☞ **बाकी स्वरांतील म्हणी पुस्तकाच्या शेवटीं दिल्या आहेत.**

## क.

ककडीके चोरीकों, गरदन नही मारते.
कच्च्या धाग्याचें बंधन सैल, कैसा आकळे ढांडगा बैल.
कच्च्या पायावर बांधलेली इमारत किती दिवस टिकणार.
कर्ज काढून करणें सण, ह दुःखाचें कारण.
कर्ज घेऊन आपण विसरतो पण सावकार सदां स्मरतो.
कर्ज घेतां वाटे हौस, देतांना फाल्गुन मास.
कर्ज देऊन हरणें, हें मूर्खाचें खेळणें.
कर्ज फार त्याला लाज नाहीं, उवा फार त्याला खाज नाहीं.

कर्जाच्या पाठीवर असत्याची स्वारी.
कर्ज केल्यामागें, खोटें बोलावें लागे.[नसतो.
कर्ज मागतांच देतो. तो सरळ असून सुज्ञ
कटकाची हांडी कटकींच फोडावी.
कटकास गुळवणी.
कडवे झाडाला फळ बहू आणि उण्या माणसाला बोल बहू. [माणसाला फार खाज.
कडवे झाडाला बहू बाज आणि म्हाताऱ्या
कडू कारलें तुपांत तळलें व साखरेंत घोळलें तरी कडू तें कडूच. [रू लोकांचें.
कडेवर घेतलें, खांद्यावर घेतलें तरी लेंक-
कणे कणे जमे गिरी, वर्ष पळे पळांतरीं.
कण्या खाऊन मिशास तूप लावणें.
कण्या घालून कोंबडी झुंजविणार. [ दळा.
कणिंग गेली तळा आणि बारीक निरीक
कणतो कुंथतो पण मलीद्याला उठतो.
कधीं तरी मरणें आहेच, त्यांत आज काय आणि उद्यां काय.
कधीं उजवा कधीं डावा.
कनक आणि कांता (अनिष्टास कारण).
कन्या आणि मेले मासे, ठेवतां माल नासे.
कन्याकूळ, भांडणाचें मूळ.
कन्याकूळ, पैक्याला मूळ.
कन्या देऊन मग कूळ विचारणें.
कनोडी बिल्ली, चूहेके कान कतरवावे.
कपट आपलें आपण, करितें विष प्राशन.
कपट गुप्तपणें राहतें, सत्य उघडें वागतें.
कपटी मित्राचें मन, अधिक दुष्ट सर्पाहून.
कपटेन शत्रुः. [ठेवी.
कपटी बोलून फसवी, त्यासमयीं हुशारी
कपटानें द्रव्य मिळतें, अवघें कुकर्मानें जातें.
कपाळपासरी बरोबर. [ की बाधक.
कपटाचा सल्ला घातक, लढाई नाहीं इत-
कपाळाला कपाळ घांसल्यानें दैव येत नाहीं.
कबूल अपराध नाहीं केला, तर तो दुप्पट दोषी झाला,
कबूल करून तें न देणें हें मूर्खाचें संतोष पावणें.
कभी दिन बडे, कभी रात बडी.
कर्मणो गहनो गतिः
कर्माची वरात व म्हातारी घरांत.
कर्माची रेघ टळे ना टळे.
कर्माच्या गती सांगाव्या किती.
कर्माच्या भोगा आणि तीन डोळे दोघा.
करडीला नाहीं किडा बोडकीला नाहीं पिडा.
कर नाहीं, त्यास डर नाहीं.
करणी करावी तशी भरणी भरावी.
करगीया दाढीवाला, पकडा गीया मुछोवाला.
करणी कसाबाची व बोलणीं मानभावाचीं.
करणीची बळें अमृत फळे.
करणें एकपट खाणें दुप्पट.
करणें थोडें व बलबल फार.
करणें अशाश्वत, चिरकाल नाहीं राहत.
करतां नये व्यवहार, त्यानें न करावा व्यापार.
कर्मीं फळ आणि तपीं राज्य.
करवेल तितकें घ्यावें, बाकी सोडून द्यावें.
करारी शब्द एक, फुकट असती अनेक.
करावा जसा आदर तसा मिळे प्रत्यादर.
करावें तसें पावावें, रांधावें तसें जेवावें.
करायाला गेली पर, तिवई आली वर.
करायास जावें एक व होतें एक.
करतां रोख व्यवहार सधन होती सावकार.
करितां दुर्भाषण, वाईट मनाचें लक्षण.
करितां करावें, होणार तें होतें.
करितां नये काम, ठेवी हत्यारां दूषण.
करील तो भरील [ खाती.
करी गुळाचा गणपती, माशा येऊनियां
करी चोरी और शिरजोरी.
करील त्याचें काम.
करी भूमी उत्पन्न तेणें राजा रंकाचें पोषण.
करील त्याचा कारभार, मागिल त्याची तलवार.

करी हिताचें शिक्षण, खरें मित्रत्व लक्षण.
करी ज्ञानाचा अभ्यास, होय सुखोपभोग त्यास.
करूं गेलों तुज व झालें मज.
करून दाखवावें, बोलून दाखवूं नये.
करूं जावें एक आणि होतें भलतेंच.
करून करून भागली देवपूजेला लागली.
करूं जातां अतिचेष्टा स्नेहांत पडे फांटा.
करूं जातां एक घडून येतें विपरीत.
करूं जातां एक प्रारब्ध घडवी अनेक.
कलका बनिया आजका शेट.
कल सरेपर बडी आफत है.
कलकी बात राम जाने. [ कुळांतून करणें.
कलम बरें जमिनींतून घेणें, कन्या चांगले
कलमकसईपेक्षां जातकसई बरा. [ ख्याती.
कलाकौशल्य ज्याचे हातीं, त्याची होई जगीं
क्वचित् काणा भवेत् साधुः.
क्वचित् गानी पतिव्रता.
कवडी कवडी माया जोडी.
कव्वा हन्सकेसी चाल शिकताथा, आपनिभी चाल भूल गई.
कव्वेके कोसे ढोर नही मरते.
कवीस गुरु आहे पण उपज आंगस्वभाव.
कवला महादेव पावला. [ शीक.
कशी मागावी भीक तर तंबाकू खायला
कशांत काय आणि फाटक्यांत पाय.
कशास ठिकाणा नाहीं आणि बुधवारीं लग्न.
कष्ट करतां बहू प्राप्ती, आळसानें गरीबी येती.
कष्ट गोड लागती तर होय बहू प्राप्ती.
कष्टावांचून सिताफळें येत नाहींत.
कष्टीं फळ तपीं राज्य.
कसबिणीच्या पोरास दिवसास बाप नाहीं व रात्रीस आई नाहीं.
कसब्याला कसबी शत्रूप्रमाणें पाहतो.
कसर करील तो पोट भरील.
कसें झालें तरी वाघाचें पिलूं.
कसीगे सुने, घरासारखी.
कसाबाला गाय धार्जिण.
कसे हाडा पण न बुजे खाडा.
कहां भोजराजा, कहां गंगु तेली.
कहा बुढीया, कहां राजकनीया.
कहूं तों मा मारी जाय, न कहुं तो बाप कुत्ता खाय.
कहे जर्मानकी, सूने असमानकी.
कळ नाहीं कोठें आणि झाडाला झटे.
कळतें पण वळत नाहीं.
कळीचा नारद मुनि.
काकडीची चोरी बुक्याचा मार.
काकमैथुन पाहावें तर सहा महिन्यांत स्मशानांत जावें. [ खावाना.
काका मामा कहेवाना ने गांठे होय तो
काखेंत कळसा गांवांत वळसा.
काखेंत मूल आणि गांवभर शोध.
कागदांत मेळ, हातांत केळ. [ डुबे.
कागजकी बनगई नांव, आज न डुबे कल
कांचेचें भांडें.
काजव्याचा उजेड त्याच्या गांडीपुरता.
काजळाच्या कोठडींत गेलें तर तोंड काळें, मोजले तर हात काळे.
कांटा मोडला नायटा झाला.
कांट्यास लाथ मारली तर तो रुतल्याशिवाय राहणार नाहीं.
कांट्यांत खुंटा निघाला.
काटकसरीवांचून द्रव्य संग्रहीं राहत नाहीं
काटेवाड नाम तलवारका.
काठीनें पाणी शेंदणें.
काठी मारल्यानें पाणी वेगळें होत नाहीं.
काडी आड गेला तो पर्वता आड गेला.
काडी आड डोंगर
काडीची सत्ता लाखाची मत्ता.
काडी चोर तो माडी चोर.
काडीची आग माडीस लागते.

काडी न मोडे व डोळा न फुटे.
काडीमात्र अकलेचें तोल, भराभर विद्येचें मोल सारखेंच. [ बैल.
काढा तुमचा देव्हारा, पुजूं द्या माझा लांडा
काणा कैफती व आंधळा हिकमती.
काथानी दोरडी बळे पण बळा नाहीं सुख.
कांधाला भिस्मिल्ला कशाला.
कांधाचें कोरड्यास, मानभावाची बायको व गाढवाचे जित्राबांत श्रम नाहीं.
कांदा आणि मर्दाचा बांधा.
कान द्यावा पण कानू न द्यावा.
कानमे तेल डाल बैठे है.
कान निरुपयोगी झाले तर उपयोगी डोळे.
कानाचा हलकट व तोंडाचा बोलकट.
काना मोको नभाय, नहीं काने वीनसे हाय.
कानाला कोपर जडेना सासू मेली जांवई रडेना.
कानांत व डोळ्यांत चार बोटांचें अंतर.
कानाडीन कला मराठी भ्रतार, सुखाचा विचार तेथें कैचा.
कानामागून आलें व तिखट झालें.
कानामागून शिंगें आलीं तीं तिखट झालीं.
कानांत बुगडी, गांवांत फुगडी.
कानी को काना औररानी को राना प्यारा.
काप गेले पण भोंकें राहिलीं.
कापल्या करंगळीवर देखील मुतायचा नाहीं.
कापलें तरी आपलें.
कालें करून येतें, समयपरत्वें जातें.
काल मेला, आज पितर झाला.
कांबळ्याची दशी आणि पासोड्या ऐशी.
कामकरते मनुष्यावरी, जबरदस्ती न करी.
काम करील तो पोट भरील.
कामका न काजका शेरभर अनाजका.
काम चांगलें आरंभलें ह्मणजे समजा अर्धे झालें. [ पाठीव दुजा.
काम झालें पाहिजे तर स्वतः जा, नको तर
काम नसतां उदास, बहू काम आयास.
काम निर्लज्जेचें करावें, तसें ऐकून घ्यावें.
कामदाराची घडी, आणि वतनदाराची पिढी.
काम होऊन जातें, शब्द राहतो.
काम थोडें बोभाट मोठा. [ चांगला.
कामकरतें मनुष्याला, मुशारा असावा
काम पडल्या पुसती, झाल्यावरी विसरती.
काम वहिवाटल्या अंतीं, मनुष्याची परीक्षा होती.
काम करणें तें उत्तम, गौरवणें तें मध्यम.
कामक्रोधादि जिंकावे, स्वस्थ संसारीं असावें.
कामापुरतें बोलावें, शहाणें व्हावें.
कामांत चूर दिसती कांहीं करीत नसती.
कामातुराणां न भयं न लज्जा. [ बाई.
कामापुरता मामा आणि ताकापुरती आजी-
कामामध्यें काम भज भज मना राम.
कामावें तर सामावें.
कामास कापतो पण घाम येईतों खातो.
काय असे रंगावर, केवळ गुण ग्रहण कर.
काय बोलावें भाटाला, बडबड्या उंटाला.
कायदे बहूत न्याय थोडक्यांत.
कायदे सदा फिरती आजचे उद्यां नसती.
कायद्याविरुद्ध करणें, राजभय ये तेणें.
काय गेलें तळतीचें, काय गेलें वळतीचें.
कारभार योग्य करी, निंदेचा संतोष धरी.
कार्य गुप्त ठेविती, त्यांत संशय उद्भवती.
कार्यासमयीं खर्चावें, एरवीं संभाळून ठेवावें.
कारागिराची माहिती, कामावरून होती.
कारे महारा उताणा, ह्मणे हातीं दीड आणा.
कारे पाहुण्या कुंथतोस, ह्मणे बसला जागा रुतती.
कारटे पोरटे सदा चोरटे.
कारकुनाचें लिहिणें व उंदराची खाद.
कारकुनाचें अवदान व भटास महादान.
कारभारांत गुह्यपण, हेंच त्याचें साधन.

कालचा जोगी व मांडभर जटा.
कालाची गती, कोणा नावरती.
काली बादली डरावनी, धोला बरसन हार.
काळें द्वेष थंडावतो, शोक शमतो.[पडली.
कावळा बसायास व खांदी मोडावयास गांठ
कावळा करकरला म्हणून पिंपळ मरत नाहीं.
कावळा करकरला आणि पिंगळा बडबडला.
कावळ्याच्या शापानें गुरें मरत नाहींत.
कावळ्याच्या गळ्यांत माणीक.
काशी केली वाराणशी केली पण कपाळ-
ची कटकट नाहीं गेली. [ थुरादास.
काशीस गेला काशीदास, मथुरेस गेला म-
काशीस गेल्याचें आपण सांगतो पण
मांजर मारल्याचें सांगत नाहीं.
काष्ठ नाहीं तेथें अग्नि नाहीं, चहाड नाहीं
तेथें तंटा नाहीं.
कासवाच्या पिलाला पोहायला शिकवावें
लागत नाहीं.
कांहीं असती शहाणे, कांहीं वागती मू-
र्खपणें. [ आधींच त्रास.
कांहीं प्राप्त होईना ज्यास, तो म्हणे मला
कांहीं बोलल्यावांचून काम होत नाहीं.
कांहीं सोन्याचा गुण, कांहीं सवागीचा गुण.
काळ आणि ओहटभरती, नाहीं कोणाचे
हातीं.
काळ आला उफराटा, न करी कोणाशीं तंटा.
काळ आला होता पण वेळ आली नव्हती.
काळ प्राण हरण करितो पण वैद्य प्राण
आणि वित्त नेतो.
काळा काळा ढुस्स त्याला उंदीर करी फुस्स.
काळा ब्राम्हण गोरा शूद्र त्यास पाहून
कांपे रुद्र.
काळा हमाल गोरा ढमाल.
काळीवर नाहीं शेत, पांढरीवर नाहीं घर.
काळें खोटें नाश पावतें, खरें सिद्ध होतें.
काळे राळे गोरे राळे राळ्यांत राळे मिसळले.
कीकीरे कीकी तो एकवार सिकी. [प्रदीप्त.
किंचित वाऱ्यासंयुक्त, अग्नि मोठा होय
किंचित् करणें फार दाखविणें. [ बराबर.
किती चालसी झराझर तरी दोन्ही पाय
किंमत घड्याळीं चालीवर, तशी मानवी
पराक्रमावर. [ पाहणें.
किंमत पैक्याची जाणणें तर कर्ज मागून
किल्ला घ्यावा पण कोणाचें नाव न घ्यावें.
किसका हात चले, किसकी जबान चले.
किडे मुंगी खाई तर तारूं सलामत जाई.
कीलोत्पाटीव वानरः.
कीर्तनीं संत उभा भगवंत
क्रियेवांचून ज्ञान पंगू.
कुकर्माचा त्याग करी ती सत्कर्माची पायरी.
कुकर्मानें करी प्राप्ती, ती राहत नाहीं हातीं.
कुकर्मानें बाप फसला, तें पाहून मुलगा
सुधारला.
कुच रोटी कुच लंगोटी.
कुचेष्टेवांचून प्रतिष्ठा नाहीं.
कुडास कान, ठेवी ध्यान.
कुडी पाहून पुडी.
कुणबी मेला भुतानें, ब्राह्मण मेला वातानें
आणि सोनार मेला पित्तानें.
कुणबीजात विळ्या इतकी वांकडी, पण
ठोकून होती नेटकी.
कुणब्याचा बेटा, गांडींत लंगोटा पण ध-
र्माचा मोठा.
कुणब्याची आई कुणब्यास व्याली.
कुणब्याच्या जातीला आडवें ना उभें.
कुणब्याचें पोर शहाणें झालें तरी गोंध-
ळ्याची कथा गाईल.
कुणब्याचें गेलें गुराख्याचें आलें.
कुणब्याला जो म्हणेल आप, त्याचा
गाढव बाप.
कुणब्यासारखा दाता नाहीं, पण ठोक-
ल्याबिगर देता नाहीं.

कुत्ता जाणें, चमडा जाणें.
कुत्ता धोबीका, न घरका न घाटका.
कुत्ता मोह देनेसे सरचढे.
कुत्तेकू खीर और गद्धेकू चपात्या.
कुत्रा आपल्या ओकावर परत येतो तसा मूर्ख स्वभावावर जातो. [ न धर.
कुत्रा मुका, पाणी गंभीर, यांचा विश्वास
कुत्रा संगें बाळगणें, त्याचें पोषण करणें.
कुत्रे दुरून भुंकती, ते कदापि न डसती.
कुत्रे हाडुक मारल्यानें मरत नाहीं.
कुत्र्याचा पाय मांजरावर आणि मांजराचा पाय कुत्र्यावर.
कुत्र्याच्या शेंपटीवर पाय देऊं नका.
कुत्र्याचें गोत आणि कोळ्याचें सूत.
कुत्र्याचें जिणें, फाजितीला काय उणें.
कुत्र्याचें मुर्वतीनें मरण.
कुत्र्याचें मूत.
कुत्र्याचें शेपूट कितीही दिवस नळकांड्यांत घातलें तरी अखेरीस वांकडें तें वांकडें.
कुत्र्याला खीर व मुत्र्याला पासोड्या.
कुपात्रीं धर्म घडे, पदरीं पाप पडे.
कुपुत्राची अडचण होती सहन, त्याला दुःख होतां वाटे कठीण. [ वसू.
कुभांडी तो जंगली पशू, आर्जवी तो पाळींव
कुमार्गीं जाणें, बट्टा लागणें.
कुऱ्हाडीचा घाय, तेथें बघतोस काय.
कुऱ्हाडीचा दांडा, गोतास काळ.
कुरूप स्त्री, सांकडें घर, निभावती निरंतर.
कुलीन असून शक्तिहीन, तो भिकाऱ्याहून दीन. [ खेद करी.
कुलीन मनीं वाहे थोरी, अकुलीन अंतरीं
कुवा टळे पण रजपूत न टळे.
कुसंगाशीं संग, प्राणाचा भंग.
कुसंतानापेक्षां निसंतान चांगलें.
कूळ झालें नादार, त्यापासून काय मिळणार.
कुळवाडीभाई, ऐकायचा नाहीं.

कुळवाडी भाई, वांकडा तिकडा जाई.
कुळास फोड आणि संतानास वेड.
कुळीं असतां लांछन, ठेविती सर्व दूषण.
कुळीदना होय मांडा, तर रडत्या कां रांडा.
कृतघ्नता भलाई करणें, मोठ्या संकटांत पडणें
कृतघ्नतेच्या संगतीं, निर्लज्जाही असती.
कृतज्ञता तें सदाचरण, कृतघ्नता तें दुराचरण.
कृपण धन रक्षण करी, उदार त्याचें स्वरूप करी.
कृपणाचा पैका गांठीं, देतां प्राण येतो कंठीं.
क्रूरकर्म आचरती, यांस भीति उत्पन्न होती.
क्रूर दृष्टीनें पाहे, अंतरीं दया वाहे.
क्रोध आणि शांति, आहे एकाच्या हातीं.
क्रोध ज्याचा त्याला आवडतो इतराला शत्रु वाटतो. [ वृद्धदशेस.
क्रोध, मत्सर, जीवित्वनाश, चिंता आणी
कुंभकर्णाचीं जांभई.
कुंभार तसा लोटा आणि बाप तसा बेटा.
कुंभार, नाहीं सुमार.
कुंभाराची सून उद्यां उकिरड्यावर येईल.
कुंभारापेक्षां गाढव शहाणें.
कुंभारास मडकें धड नाहीं.
कुंभारणीनें कुंभारणीशीं कज्जा केला, गाढवाचा कान पिळला. [ शिरीं.
केव्हांही उन्माद न धरीं, कायदा असे सर्वां
केशाचा अपराध आणि न्हाव्यास दंड
केस ना मेस, बोडकीस बेस.
कोंकणस्थ, भात भोकणस्थ.
कोंकणांत नारळ फुकट मिळतात.
कोंकणी देव कडक आहेत.
कोंकणी भूत चावल कूट.
कोंकणे आणि भातभोकण्ये.
कोकालो फलदायकः.
कोठी थट्टी पागा, पोट भरण्याच्या जागा. [णी
कोठें इंद्राचा ऐरावत, कोठें शामभटाची तटा-
कोठें कांहीं कोठें कांहीं, एक आहे एक नाहीं

कोठें जाशी भोगा तर तुजपुढें उभा.
कोठेंही गेला तरी पळसाला पानें तीन.
कोठेंही गेलें तरी मृत्यु चुकत नाहीं.[बापा.
कोठें होईल ईश्वरकृपा, तें सांगवत नाहीं
कोडग्या कोडग्या लाज नाहीं, कालचें बोलणें आज नाहीं.
कोण कोठून मी आलों, कोठें जाया निघालों, आतां करितों काय, विचार निरंतर करीत जाय.
कोण तर म्हणे कोपरा. [ भरंसा.
कोण दिवस येईल कैसा, नाहीं देहाचा
कोणा एकांतीं छेडणें, पोटीं राग न ठेवणें.
कोणतीही चोरी करी, तरी पाप बसे शिरीं.
कोणाचा कोण आणि पितळेचा होन.
कोणाच्या गाई म्हशी आणि कोणाला उठाबशी. [ वाढतात.
कोणाचे कोणी मरतात, भटांची श्राद्धें
कोणाचें वर्म काढूं नये.
कोणाचें होऊं नये चाकर आणि कोणाची होऊं नये बायको, व्हावें तर प्रसंग येईल तसें वागावें.
कोणाला कशाचें, बलुत्याला पशाचें.
कोणाला कशाचें, बोडकीला केंसांचें.[नये.
कोणाला तिरस्कारूं नये,कोणाची निंदा करूं
कोणाला विद्या, राजसत्ता, कोणाला नुसती दरिद्रता. [ लोभ न धरी
कोणावरही जो प्रीति नकरी, त्यावर कोणी
कोणास काय बोलावें हें मनन करून ठेवावें
कोणी आपले दोष न छेडी, त्याचें पुन्हां आचरण करी.
कोणी चाखून रांधीत नसतो. [ निराशा.
कोणी देतां मोठी आशा, त्याची धरावी
कोणी नुकसान केली, ती तत्क्षणीं विसरावी
कोणी पाण्यांत पाहती, कोणी आरशांत पाहती.
कोतवालपुत्र निभावून, जातो सर्व अरिष्टांतून
कोता है गरदन तंग पिछानी, हरामजादेकी यही निशानी.
कोमळ शब्दें हृदय द्रवे, जैसें बर्फ उष्णासवें.
कोल्हा काकडीस राजी.
कोल्हा पांडित्य सांगूं लागला, तर जपावें आपल्या हंसाला. [ त्याहून जास्ती.
कोल्हा मोठा हिकमती, धरी त्यास तो
कोंवळें झाड वांकवावें तसें वांकतें.
कोळसा उगाळावा तितका काळा.
कोळशांतील माणीक.
कोंड्याचा मांडा करणें.
कंडूशमनार्थ चेटिका गमनं.
कंथा, माळा घातल्यानें फकीर होत नाहीं

## ख.

खट गाय खाटकाचे घरीं बरी.
खट नट, त्याला गिऱ्हाईक भट.
खटपट करितां, सारीपाट खेळतां.
खटाटोपो भयंकरः.
खडकावर पेरलें, व्यर्थ गेलें.
खडकावरचा गाडा. [ बोल बहू.
खडण गुरां दूध बहू, उण्या माणसाला
खडा टाकून अंत पहावा. [ बोभाट.
खडे खाठ, खिसेमें झ्याट, और गांवभर
खपेल त्याचें शेत, जपेल त्याची लक्ष्मी, व मारील त्याची तलवार.
खप्पड झाले गाल, आतां विठ्ठलवाडीस चाल
ख्याली खुशाली केली ज्यांनीं, धन, शक्ति अब्रूची केली हानि. [ दुखतें.
खर्चणाराचें खर्चतें पण कोठावळ्याचें पोट
खर्च लागे निरंतर, मिळकतीस नाहीं आधार.
खर्च लागे निरंतर, त्यांत नाहीं अंतर, मिळकत अशाश्वत, विचार करी सतत.
खरजेला भांडवल कांडवल.
खरा धंदा करी, चाले वारशापरी.
खरा मित्र बाळगती असे थोडे.

खराबींत आला तरी तोरा नाहीं गेला.
खरारा खाजवी, नगारा वाजवी.
खरी थट्टा करिती,अपराध्याच्या मनीं बिंबती.
खऱ्याखोट्याचा निवाडा न्यायी करती रोकडा
खऱ्याखोट्यामध्यें चार बोटांचें अंतर.
खऱ्या मनुष्याची वाणी, दस्तऐवजासमान.
खऱ्याला कांहीं, भय नाहीं.
खरें खरें सभ्य असावें, सोंग कां धरावें.
खरें बोलेल तो उपाशी मरेल.
खऱ्याच्या गांडींत मेख मारणें.
खलककी जबान, खुदाका नगारा.
खाईना तो करंटा.
खाईल तो गाईल.
खाईल तो वाहील.
खाईल तोटा तो होईल मोठा.
खाईन तर तुपाशीं, नाहीं तर उपाशी.
खाई त्यास खवखवे.
खाऊं जाणें तो पचवूं जाणें.
खाऊन दिवस न काढावे, नांवरूप करून दाखवावें. [टाळ.
खाऊन पिऊन कंटाळ व तोंड धुवून वि-
खाऊन निंदूं नये.
खाऊन पिऊन दोन पैसे बाळगून असणें.
खाऊन माजावें टाकून माजूं नये.
खाखरनी खलेडी दराखनो सवाद शूं जाणें.
खाजवील त्याची खरूज, चिंढेल त्याचा कज्जा.
खाजवून अवधान आणणें.
खाजवून खरूज काढणें.
खाण तशी माती आणि आत तशी भाची.
खाणें खाण्यासारखें व दुखणें पहिल्यासारखें.
खाणें थोडें आणि मिचमिच बहूत.[घसई.
खाण्यापिण्याची टंचाई, नमोनारायणाची
खातां खातां जन्म गेला आणि वांकडीं फळें कशाचीं. [डंश होतो.
खातां मधु गोड लागतो, पण मक्षिकांचा
खातीचे गाल व न्हातीचे बाल छपत नाहींत.
खातेंपोतें बरोबर.
खाद आहे तर लाध आहे.
खाद हरी व्याध. [म्हणे.
खादाडा नजरभर देणें, पोट भरतां पुरे न
खादाडाची वृत्ती, दानसील नसती.[नाहीं.
खादाडाला चव नाहीं व उठवळाला विसावा
खानदेशे आणि डाळनासे.
खाना वहा खावो, तो हात यहां धोवो.
खाने पीनेकू मै, लढनेकू कुवडा भाई.
खाय किसीका और गाय किसीका.
खाया पिया भरा पेट, झक मारे नगरशेट.
खायाला आजी, करायाला शेजी.
खायाचे दांत निराळे व दाखवायाचे निराळे.
खायाला आधीं, निजायाला मधीं, कामास कधींमधीं.
खायाला काळ व भुईला भार.
खायास अगडबंब, म्हणायास मुखस्तंभ.
खाऱ्या पाण्यानें तोंड धुवून ये.
खारें पाणी आडांत, गोडें कोठुन पोहऱ्यांत.
खालच्यानें कुंथावें तों वरलाच कुंथतो.
खालीं लवावें तर कांहीं मिळावें.
खाल्ल्या अन्नाची विस्मृति, लौकर पडती.
खाल्ल्यास खावेसें वाटतें.
खाल्लें अन्न आंगीं लागत नाहीं.
खाल्लेघरचे वांसे मोजणें.
खावें काय पुरुषानें.–उत्तर–दम.
खावें जातीचें किंवा खावें हातीचें.
खावे तत्ता पीवे, उस्का रोग घरघर रोवे.
खांद्यावर भाला आणि जेवायाला घाला.
खाववेना तर खाववेना, लोटून कां देववेना.
खांबाला डीक पाहणें.
खिडकींत उभी राहे, जन तिजकडे पाहे.
खिरींत सराटा आणि ब्राह्मणांत मराठा.
खिशांत नाहीं अडका आणि बाजारांत घ्यायला जातो धडका.

खिळ्यामुळें नाल गेला, नालामुळें घोडा गेला, घोड्यामुळें स्वार मेला, एवढा अनर्थ खिळ्यानें केला.
खिळे खातांना गोड वाटतात, पण हगतांना समजेल.
खुजाला हंसूं नको, खुजा होशील.
खुदाकी बात खुदाही जाने.
खुदाके वास्ते बिल्लीभी चुव्हां नहि मारते.
खुदाके गहजबसे डरते रहीये.
खुदाके घरसे फिर आये है.
खुदा हरामजादेको नाखून नदे.
खुश दिल ज्याचें असें, मुख त्याचें फुलें दिसें.
खुशामत करून देती, शेवटीं याचना करिती.
खुशामत, खोटें धन, स्वीकारतां खिन्न मन.
खुशीनें करणें तें सोपें वाटणें.
खूट आहे पैशाची, गरज नाहीं पिशवीची.
खून छपत नाहीं.
खूब खाय वाल तर होतील मोठे गाल.
खुंटावरचा कावळा.
खुंटीनें हार गिळणें.
खेटरानें पाणी पाजणें.
खेडें आणि वेडें.
खेळणारापेक्षां पहाणारे फार.
खेळणारे जुवेकरी, फार दिवस टिकत नाहींत.
खेळतां घोडा जिंकणें अथवा जीन हरवणें.
खेळेल तो पोळेल.
खेळांत ठकवितो तो व्यवहारीं भला नसतो.
खैरात की टुकरी और बजारमे डकार.
खैराचें झाड व झातान्याचें हाड.
खोटा तरी गांठचा, वेडा तरी पोटचा.
खोट्या मित्रापेक्षां प्रसिद्ध शत्रु बरा.
खोट्याचे कपाळीं कुऱ्हाडीचा घाव.
खोट्याचे नांवाची होय माती, खऱ्याची वाढे कीर्ति.
खोटें बोलतां कष्ट होती, खरें बोलतां श्रम हरती.
खोटें बोलण्याची आदत, जन्मवर नाहीं जात
खोटें बोलेल तो तीनदां जेवील.
खोटे लोकांना साक्षी फार मिळतात.
खोड जडली बाळपणीं, सुटत नाहीं मोठेपणीं.
खोड्यांत पाय घालावयास येतो, पण काढावयास जड जातो.
खोदे उंदर, भोगवे भुजंग.
खंडीस दहा मणांचें भोळें.
खंडीमध्यें पाव रती.

## ग.

गची व्यथा असणें.
गढीयाके पानीसें मुह धू आव.
गणेशाचें हाले दोंद, चंडकीचा जातो प्राण.
गतं न शोकं.
गद्धा कीया जाने आदेका सवाद.
गद्धा पिटे, तेजी नहीं बनता.
गद्धीसे प्रीत जडी तो पद्मीन क्यां झांट है.
गद्धेनें खेत खाया, पाप ना पुन.
गद्धेभी जवानीमे, भले मालूम देते है.
गया बखत फेर हाथ आता नहीं, सदा ऐश दवरान दिखातां नही.
गरज लागती, लज्जा दूर होती.
गरज लागे त्या वेळे, मित्राची परिक्षा कळे.
गरज सरो, वैद्य मरो.
गरजवंत तो दरदवंत.
गरजवंतालाअक्कल नाहीं व हौसेला मोल नाहीं.
गर्जून बोलूं नये घरीं, राग न झाडीं चाकरावर.
गरवशीचें पोट आणि नवऱ्याला आळा.
गर्दन सुरी आयती, दिली आहे तुझ्या हातीं.
गप्पा आणि लबाडी, जाते तोंडोंतोंडीं.
गरीब असावें पण दुबळें नसावें.
गरीब कष्ट करिती, तालेवार उपभोग घेती.
गरीबकी जोरू, सबकी भावी.
गरीब खरें बोलती, सभेंत खोटें मानिती.
गरीब गडी, गव्हाची वरव.
गरीब गर्वी, लोभी धनी, पाहतां दुःख वाटे मनीं.

गरीब गाई, दांत कांगे नाहीं.
गरीब पाहती, त्यास सर्व दाबती.
गरीब पाहती, सर्व मस्करी करिती. [हाले.
गरीब बोले, दाढी हाले; राजा बोले, दळ
गरीब माणूस शिष्यासमान.
गरीबा सदाचरणीं भूषण, श्रीमंतां दुराच-
रणीं अपमान. [ तोटा.
गरीबाला अल्प तोटा येतां, त्याचा होय मोठा
गरीबाचा काळ, थोराचा प्रतिपाळ.
गरीबाची अक्कल, जैसे वनीं गजमहाल.
गरीबाची घोंगडी, त्यास ती शालजोडी.
गरीबाचें गेलें घोंगडें, गरीब पडलें उघडें.[ण.
गरीबाजवळ नसतां धन,दैव कसें करील हर-
गरीबानें खाल्लें तर पोटाकरतां, पण श्रीमं-
तानें खाल्लें तर औषधाकरितां.
गरीबाला कर्ज जरी,होतो बोभाट लोकांतरीं.
गरीबाला नऊ मण चर्बी. [ गेला × ड.
गरीबाला पडला दंड, तर न्यायाधीशाचा
गरीबाला बहु मुलें होतीं, त्याची चिंता
ईश्वराला असती.
गरीबाला विद्या धन, द्रव्यवानाला भूषण.
गरीबास उपद्रव देणें तर आपण खालीं पडणें
गरीबास सुसंतति, तीच त्याची संपत्ति.
गरीबींत मीपणा, तर होय विटंबना.
गरीबी प्रवेश करिती, तेथें प्रीति सोडून जाती.
गरीबी येते, लाज जाते.
गरुडापुढें मशक. ( नसावी )
गवत गोंडाळ, शेत घोंडाळ, बायको तोंडाळ
गवयाचें पोर रडलें तरी सुरावरच रडणार.
गर्व हरणें, त्यासीं संबंध न ठेवणें.
गर्वदृष्टीचें लक्षण, दिसतें तोंडावरून.
गर्वाचें घर खालीं.
गव्हाइतकें सुख, पायलीइतकें दुःख.
गव्हाची कणीक करणें.
गव्हाबरोबर किडे रगडले जातात.
गळा कापला, खोकला गेला.
गळापूड काम, तेथें खर्चे पदरचे दाम.
गळ्यांत नाहीं सरी, सुखें निद्रा करी.
गळ्यांत माळा, पोटांत काळा.
गाईचें गेळीं आणि म्हशीचें वेळीं.
गाईनें गाय फळत नाहीं.
गाईनें गिळलेलें माणीक.
गाईला वासराचें व बायकोला पोराचें मीस.
गाईस नाहीं चारा, शेतांत नाहीं थारा.
गाजराची चोरी व फांशीची शिक्षा.
गाजराची तुळा व विमानाची वाट.
गाजराची पुंगी वाजली तर वाजली, नाहीं
तर कुरांडून खाल्ली.
गाजरें पारख्या.
गाडगें धुऊन कढी करणार.
गाडीची वाट फासडीनें मोडावी.
गाड्याबरोबर नळकांड्याची यात्रा.
गाड्यावर नाव व नावेवर गाडा. [भाड्यावर.
गाडेकरी बसला गाड्यावर व बायको दिली
गाढव ओताऱ्याचें आणि बाईल म्हाताऱ्याची
गाढव गूळ हगतें तर डोंबारी कां भीक मागते.
गाढव जसा मुगुटधारी, तसा राजा निरक्षरी.
गाढव भार वाहतो, सिंह हिंसा करतो.
गाढव म्हणे माझी हरळी मऊ.
गाढव मारतो लाथा, बैल मारतो शिंग.
गाढव लाथ झाडी तर काठीनें झोडीं, पा-
यानें मारशील तर दुसरी लाथ झाडील.
गाढव स्वारीस गेलें, घोडा होऊन आलें.
गाढवांचा गोंधळ व लाथांचा सुकाळ.
गाढवाचे गोणीस खंडीचें भोळें.
गाढवापरी व्हावें, तर बोलतील तें ऐकावें.
गाढवास गुळाची चव काय.
गाढवास टोणपा, तेजीस इशारा.
गाढवास हाडें, कुत्र्यास वाढें.
गाणाराचा गळा आणि नाचणाराचा चाळा
गातां गळा, शिंपतां मळा, व लिहितां
हातवळा.

गादी काम शिकवते.
गालिफाचा माल व शाहाण्याचा खुराक.
गावयास गुरू, गुराख्यास तारू.
गायकसायापेक्षां कलमकसाई खोटे.
गाय घोरे गोठा भरे, बैल घोरे धनी मरे.
गाय तर विकावयास पाही, दुधावांचून सरत नाहीं.
गाय माय, तिची सेवा करीत जाय. [ सतीं.
गाय मारकी असती, तिचीं शिंगें लांब न-
गाय स्वघरीं, सिंह बाहेरी.
गायीपासून उत्पन्न होतें तें सर्व लोणी नसतें.
गांव करी तें राव न करी.
गांवकुसूं पाडून कांट्या लावणारा.
गांव गेलें नांव राहिलें.
गांव जळाला हनुमंत निराळा.
गांव जळे मारुती पळे.
गांव तगारा आणि फुटका नगारा.
गांवचा गांड्या पण बायकोचा देशपांड्या.
गांवचा गांवढ्या गांवीं बळी, परखे गांवीं गाढवें वळी.
गांव चालावितो तो गांवचा वैरी, संसार चालवी तो कुटुंबाचा वैरी.
गांवांत वऱ्हाड आणि कुत्रे मुराड.
गांवामागें घोडें व वरातीमागें वेडें.
गाही मासा, गाही तोला.
गांगरल्या चोरास झाडाचा राऊत.
गांट गिरासे मद पिवे, लोग कहे मतवाल.
गांठचें द्यावें पण जामीन न व्हावें.
गांड धुवायाला गेला तेथें आंड हातीं लागला.
गांड नसती तर पीर झालों असतों.
गांड पाहून पाट, तोंड पाहून टिळा.
गांड फाटे पण धवला नहीं फाटे.
गांड भरे आणि देवपूजा वाढे.
गांडी गुजराथ, आगे लाथ पीछे बात.
गांडीखालचे घोडें.
गांडीखालीं आरी आणि चांभार पोरें मारी.
गांडीचा घाव न दाखविता न मिरविता.
गांडीचें सोडून डोक्यास गुंडाळणें.
गांडींत नाहीं गू, कावळ्याला करी कू कू.
गांडींत बोट घालूं नये, घातलें तर हुंगूं नये, हुंगलें तर सांगूं नये, सांगितलें तर तेथें राहूं नये.
गांडीस नाहीं खेंडा, पण दिमाखाचा झेंडा.
गिरगटकी दौड, बट्टरी तलक.
गीता संपूर्ण कानीं राहिली.
गुजर गई गुजराण, कहां झोपडी कहां मैदान.
गुणाः सर्वत्र पूज्यंते नमहत्योपि संपदः.
गुणापासून गुण उत्पन्न होतात.
गुढीचा पाडवा, नीट बोल गाढवा.
गुप्त मन उत्तम वाचा धरी, तो सुखें देशपलाटन करी. [ × × वर.
गुरवाचें चित्त नैवेद्यावर, वेड्याचें चित्त
गुरवाचें मागणें, ईश्वरी देणें.
गुरविणीचीं शितें प्रसादावारी गेलीं.
गुऱ्हाळघर आणि लग्नघर.
गुरु तसा चेला. [ घर सांगे.
गुरु पान तंबाखू मागे, शिष्या वाण्याचें
गुरुचा चेला, ब्रह्मशीचा हेला.
गुरुची विद्या गुरूला फळली.
गुरुजी या परींचे, शिष्ये हुषार बंदरचे.
गुरु गुरु विद्या, सरसर अक्कल.
गुरूला गचांडी, सरकारला कासंडी आणि भुताला दहींहंडी.
गुरूं काढतें भूक, आणि मूल काढतें दुःख.
गुलाबाची मिळे शेज, जपावें कांट्यास रोज.
गुलाबास वास, पण कांटे शरिरास. [ पानें.
गुलाबी पुष्पाच्या योगानें, खुडून घेती कांटे
गुलाम जरी झाला, तरी एका खाणींतला.
गुलाम ठोक्याशिवाय वठणीस येत नाहीं.
गुलामाला गुलाम झाल्याखेरीज संशय फिटत नाहीं.

गुह्य कोठें सांगावें, ऐसें मनीं उमजावें.
गुह्य बोलते वेळीं, मागें पुढें न्याहाळी.
गुह्य ठेवण्याची नाहीं युक्ति, तर राज्य चालविण्याची भ्रांति.
गुह्य मित्रास न सांगेल तर प्रगट झाल्यावर फजीत पावेल.
गुळाचा गणपती आणि गुळाचाच नैवेद्य.
गुळाचेंच पथ्य करावयाचें आणि गुळ गुळे खायाचे.
गुळानें मरे त्याला विष कशाला.
गुंजभर सोन्यांत गाढव मढविणार.
गुंतला मनुष्य कुंथून काय करी.
गुड दिये मरे तो जहर कांहे को दिजिये.
गूळ चारणारापेक्षां लिंब चारणारा बरा.
गूळ चोरावतो पाप, तूप चोरावतो पाप.
गूळ नाहीं पण गुळशी वाचा तर पाहिजे.
गेठें गेलें आणि भोंकें राहिलीं.
गेला मेला संपला. [ मिळत नाहीं.
गेली वेळ पुनः येत नाहीं, सदां सुख
गेली पत येत नाहीं, फुटकी कांच जडत नाहीं.
गेलें जन्मीं करून ठेवलें तर या जन्मीं फळ येतें.
गेलें तें येत नाहीं व होणार तें चुकत नाहीं.
गेलें मांणूस गुणाचें.
गेल्याचें घर व मेल्याची बायको.
गैयरके लिये खड्डा खोदे, अपही गीर पडे.
गोगलगाय, पोटांत पाय.
गोठणीच्या गाई, माभळभट दान देई.
गोड करितां भाषण, मुर्ख होय हर्षायमान.
गोड गोड बोलतो, लहान मोठ्यां ठकवितो.
गोडबोल्या, साल सोल्या.
गोड दारूची खाटी, सहज होती.
गोड बोलतां वाचे, तुझें काय वेंचे.
गोड शब्दें कोणा बोलतां, पोट मनाची न होय तृप्तता.
गोड शब्देंकरून, मूर्खाचें होय मनरंजन.
गोड गारा असत्या, तर कोल्ह्यापासून कां राहत्या. (खराब.)
गोण काळ्याचें आणि दूध गवळ्याचें
गोरी सुरेख पतिव्रता, ईश्वरी कृत्याची पूर्णता.
गोमा गणेश पितळी दरवाजा.
गोविंदू, गोविंदू, कपाळी टिळा जसा वेंदू.
गोसाव्याची जहागीर मानभाव न्याहा.
गोऱ्हयाच्यानें शेत आणि पोराच्यानें संसार होता तर मग काय.
गौर रुसली, सौभाग्य घेऊन बसली.
गोळकाचें सोंवळें, सारा वेळ ओंवळें.
गोळे मारतां सुख, पण हिशेब देतां दुःख.
गोळ्या मागें गोळा, दुखतो माझा डोळा.
गौरा रुठेगी, तो आपना स्वहाग लेगी, भाग तों न लेगी.
गंगास्नान आणि तुंगापान.
गंगेतलें पाणी गंगेंत सोडणें.
गंगेस घोडे न्हाले.
गंध उगाळितां कष्टी, आवडीनें भांग घोटी

## घ.

घटः पिबति पानीयं ताडणं झल्लरी यथा.
घटका पाणी पिते आणि घड्याळ टोले खातें
घट्ट मैत्री ठेवणें, संगे संगे वागणें.
घड मोड सोनार धड.
घडतां महापाप, होतो मोठा पश्चात्ताप.
घडत्यापडत्यास गांठ पडली.
घडित बुडवून घडणावळीकरितां तगादा.
घडून येणारी गोष्ट, छायेनें दिसती स्पष्ट.
घडून आल्यावरी, उपाय काय करी.
घणसापुढें गारुड चालत नाहीं.
घणाचे घाव सोशील तो हिरा.
घनघोर युद्ध होतें तें लौकर सलुख्यावर येतें.
घर आये कुत्ते कोभी नहि निकालते.
घरघुशी आणि घरनाशी. [ संग नाहीं.
घर घेतलें जुव्यावारी आणि तराजूला पा-

घरघोडा बाजार मोल.
घर चंद्रमौळी, केळीवर नारळी.
घरचा गाडा अंगणावांचून चालत नाहीं.
घरचा चोर आणि बाहेरचा चहाड.
घरचा चोर आणि शेजारी शिंदळ.
घरचा छोकरा घंटी चाटे ने उपाधीयाने आटो जाईछे.
घरचा झाला जागा आणि चोर आला रागा.
घरचा भाला आणि शेतचा बारा.
घरचा यजमान सुखी तर सर्व घर सुखी.
घरचा वाघ आणि बाहेरची शेळी.
घरचीं पोरें बोंबा मारतात आणि भाचा ह्मणतो माझें लग्न करा.
घरच्या देवास नैवेद्य नको.
घरच्या भयानें घेतलें रान, वाटेवर भेटला मुसलमान, त्यानें कापले नाक कान.
घरच्या मताप्रमाणें पाहुण्यानें चालावें.
घरचें खा आणि माझें नांव घ्या.
घरचें झालें थोडें आणि व्याहानें धाडलें घोडें तेंही तीन पायांनीं लंगडें.
घरचें मूल तसेंच ठेऊन उपाध्या ह्मणे माझें आधीं लग्न करा.
घर जळल्यावरी, पाण्याचा शोध करी.
घरटी, घड्याळ, बायको नीट केल्यावीण राहूं नको.
घरना घरबार, मिया महलेदार.
घरदार तुमारा, कोठीको हात मत लगाव.
घरधनी खडखडीत, बिऱ्हाडकरू हुशारींत.
घर ना दार, देवळीं बिऱ्हाड.
घर फिरलें ह्मणजे वांसे फिरतात.
घर फुंकना, तमाशा देखना.
घर भरलें आणि तोंड धरलें.
घरभेदी लंकादहन.
घरमे नही जागा, अलबेला मागे पागा.
घरमे नही दाणा, अम्मा गई पिसनेकू.
घर लागलें जळूं, विहीर लागला खणूं.
घर विकत घेऊन राहीं, बांधण्यांत नफा नाहीं.
घर सांकड आणि बाईल माकड.
घर सोडलें ह्मणजे आंगण परकें.
घर सारव तर ह्मणे कोनाडे किती.
घराची कळा आंगण सांगतें.
घरांत धाण आणि बायको माझी गोरी पान.
घरांत दिवा तर देवळांत दिवा.
घरांत नाहीं आनका, कुत्र्याचें नांव माणका.
घरांत नाहीं कवडी, घेऊं मागे शालजोडी.
घरांत नाहीं दाणा पण मला श्रीमंत म्हणा.
घरांत नाहीं मेहुणी आणि सासूची रांडोळी.
घरांत वाघ, बाहेर कोल्हें.
घरांतला दांडगा व बाहेरचा कोंडगा.
घरापरी वर गेलें, बायकोपरी बायको मेली.
घरावर नाहीं कौल पण पगडीचा कोण डौल.
घरासारखा घराचार, कुळासारखा आचार.
घरीं एकाचा स्वभाव वांकडा कीं सर्व कुटुंबाचा बखेडा.
घरीं शिमगा, बाहेर दिवाळी.
घरीं सुख तर बाहेर चैन.
घरोवर पिकतें मोतीं तर त्याची किंमत काय होती.
घरोघर मातीच्या चुली.
घरोघर शेतें दैवें पिकती भातें.
घरोघर संत, रडे भगवंत.
घरोघरीं एकच परी, न सांगावी ती बरी.
घशांत हात घातला, परंतु सुका.
घाईघाईनें धरती, माशाबद्दल बेडूक हातीं.
घाईघाईनें नाश करितो, नाशानें तोटा आणतो, तोट्यानें घरीं तंटा लागतो, इतका खटला घाईनें होतो.
घाईंत घाई, न्हाण आलें ह्मातारे बाई.
घाईनें वर चढतो, तो त्वरित खालीं येतो.
घाईनें लग्न करणें, पश्चात्ताप पावणें.
घाईप्रमाणें घोडा फेंकणें.

घाईमध्यें गलबला, म्हातारी म्हणे हेल घाला.
घागरगडचा सुभा.
घाटाजवळ दिवस मावळला. [मजल पुरी.
घाणीचे बैलाची फेरी, दिसते थोडी पण
घाबरणें हेंच अरिष्ट ओढवणें. [होय सिद्ध.
घाबरा आणि अति क्रुद्ध, यांची मसलत न
घाल पाणी आणि कर कालच्यावाणी.
घालता मी पण काढता परमेश्वर. [न होत.
घासतां दगड सतत, शेवाळ निर्माण
घांसून घ्यावें पण हंसून घेऊं नये.
घिरट, धड्याळ आणि बायको, नीट के-
ल्याविना राहूं नको. [लागते.
घिरटीस आणि बायकोस वारंवार गरज
घी खाना शक्करसे, दुनिया खाना मक्करसे.
घी गेलें आणि ठामणेंही गेलें.
घी देखे, लेकिन बडगा नहीं देखे. [दुर्गुण.
घ्यावा दुसऱ्याचा सद्गुण, त्यागावा आपला
घूंस मागें पाहती तर उरीं फुटून मरती.
घुसळी करितां उकळी भारी.
घृतकुंभ अग्नीजवळ,जातो तत्काळ पाघळून.
घे मेरे पावणे पांच.
घे सुरी, घाल उरीं.
घे हिसके आणि तोड दावें.
घेऊन पळण्याच्या कामांत ससाणा. [वर.
घेग घेरपडी मान,तर म्हणे टाक माझ्या धांवे-
घेणें दोषाचा अनुभव, हा मूर्खाचा स्वभाव.
घेतां दिवाळी, देतां शिमगा.
घेते तेथून पण पडते गुंतून.
घेतो खोटी शपथ, तो ठेवा नाहीं मानीत.
घेरलें ज्याला विपत्तीनें तो काम करतो द-
सपटीनें.
घोडा आपले गुणावर दाणा वाढवितो.
घोडा खुशीनें भार घेतो त्यावर सर्व पडतो.
घोडा चोरानें नेला, मग तबेला बंद केला.
घोडा जरेबंदी, मनुष्य संबंधी. [येत.
घोडा मेला म्हणून गाढवाला नाहीं सुतक
घोडा मैदान पुढेंच आहे.
घोडा स्वारीस ठेणें अस्थिचर्म माघारें येणें.
घोडी मेली ओझ्यानें व शिंगरूं मेलें हेल-
पाट्यानें.
घोड्या एवढें डोकें, गाढवा एवढी अक्कल.
घोड्याची टांच, कुत्र्याचा दांत, विश्वास-
डसे, मारी लाथ.
घोड्याची परीक्षा जिनावरून होत नाहीं.
घोड्याचे पायीं येणें आणि मुंगीचे पायींजाणें
घोड्यानें घोडें धांवलें तर कानाचें अंतर.
घोड्यावर हौदा, हत्तीवर खोगीर.
घोड्यावरील दोघांपैकीं एकजण मागें अ-
सावयाचाच.
घोड्याला तंग आणि माणसाला वंग.
घोड्यास आणि गाढवास बरोबरी नाहीं.
घोडें कमावतें आणि गाढव खातें.
घोडें खाई भाडें. [होत नाहीं.
घोणीचा एक पाय मोडला तरी लंगडी
घोवास नाहीं धोवकी आणि बायको करी
शिनळकी. [सोडीत नाहीं.
घोंगडीला मी सोडलें पण घोंगडी मला

## च.

चक्क माल चांदवडी, नगद माल हलवई.
चक्रं भ्रमति मस्तके.
चपळ बाईचा, मरळ गोईचा. [उपटा.
चट्टामट्टा, बाळंभट्टा, बाळंभट्टाची शेंडी
चट्टीपट्टी नगीना, मजकडे कोणी बघेना.
चट्टीपट्टीचा बोभाटा, झिपरी मारी झपाटा.
चट्टेपुढें पैका, सोयापुढें बायका.
चढ पड सर्वांस आहे.
चढणीस घोडा आणि उतरणीस रेडा.
चढती पायरी, मूर्खाला आनंद भारी.
चढेल तो पडेल, पोंहेल तो बुडेल.
चणे एकाजवळ व दांत दुसऱ्याजवळ.
चणे हैसो दांत नहीं, दांत हैसो चणे नहीं.

चित्त एक देवाकडे, दुसरें भुताकडे.
चित्त नाहीं थारी, रिकामी वेरझारी.[नाहीं.
चित्त समाधान नाहीं, त्यास चैन कोठेंही
चितारी एक दिवसांत कारागीर बनत नाहीं.
चितेपेक्षां चिंता कठीण.
चित्तास समाधान राखणें हेंच योगाचें सार आहे. [न आदरी.
चिरकाल भाजीभाकर बरी, क्षणिक पक्वान्न
चिराग तले अंधियारा. [गंगास्नानं.
चिलमी दानं शत गो दानं एक एक झुरका
चिंतन पुष्प मनाचें, शब्द फळ इच्छेचें.
चिंता वाहतां बहुत, कर्ज न फिटे निश्चित.
चिंतेपासून मनन उत्पन्न.
चिंतेच्या दगडावर दुःखाचा पर्वत कोसळला.
चिंबचळें शेतचें, थोटें पांगळें पोटचें.
चीज न राखे आपनी, और चोरोंको गाली दे.
चींवटी योंको मौत है, कारबला बस है.
चुकला घाव ऐरणीच्या माथीं.
चुकला फकीर मशीदींत शोधावा.
चुकलें गुरूं अखरास पहावें. [पडती.
चुकी मनुष्यापासून होती, शोधतांना कठीण
चुटक्याचा मांडव, मुटक्याच्या घुगऱ्या.
चुलीची फरफर, म्हाताऱ्याची किरकिर
चुलीचें लांकूड चुलींतच जळावें.
चुलींत मांजरें व्यालीं आहेत.
चुलीला तीनच दगड.
चुलीपाशीं जावें, पूर्व कर्मास रडावें.
चुलीपाशीं हगे आणि कपाळी सांगे.
चुळबुळा मुंगळा आणि पळी पळी तेल.
चूक झाली पदरीं घ्यावी, हुजत न करावी.
चूक नव्हे, चुकीचा बाप. [आहे.
चूक मनुष्यांत आहे, ईश्वरापाशीं क्षमा
चूत, चुना, हुक्का आणि मुका (बाट नाहीं.)
चूक लहान ठेवणें, तर घर वाढविणें.
चेल्याचे कान गुरूच्या हातीं.
चेहऱ्यावरून मनाची स्थिति कळते.
चैत्र गळे, कुणबी पळे.
चोख व्यवहारीं मिळवावें, तें जपून खर्चावें.
चोख सोन्यास डांकानें बट्टा.
चोरके दिलमे चोरी बसे.
चोरको चोरही पहच्याने.
चोर चोरीसे गया, तो हेरीफेरीसे न गया.
चोर तो चोर आणि धन्याहून शिरजोर.
चोर धरावा मोटे, आणि शिंदळ धरावी खाटे.
चोर सुटला, हात फुटला.
चोर सोडून कोतवालास दंड.
चोर सोडून संन्याशास सुळीं.
चोरटा हुशार, मेहनती दिलगीर.
चोराआधीं मोट उतावळी. [घेणें.
चोरा सैल दोरी देणें, आपला घात करून
चोराचा माल चोरीस गेला, तर हांक ना बोंब.
चोराचा लागतां तंटा, सावकाराला मिळतो
चोराची आई ओहोळ ओहोळ रडे. [गट्टा.
चोराची गोष्ट, मूर्खा लागे मिष्ट.
चोरांची दावण देणें. [माहीत.
चोराचीं पावलें (किंवा वाट), चोरांस
चोराचें रडें मुळमुळ.
चोराच्या उलट्या बोंबा.
चोराच्या मनांत चांदणें.
चोराचे वाडे वसले नाहींत.
चोराचे हातची लंगोटी.
चोराणां चंद्रमा रिपुः.
चोराय शष्प लाभाय.
चोराला डसला विंचू, तो करीना हूं कीं चूं.
चोराला मेसाई धार्जिण.
चोरावर मोर. [साव दिसतो.
चोरी करून श्रीमंत होतो, तो चोर असून
चोरी करंडा तो उचलील हंडा.
चोरी, चहाडी, शिंदळकी (न करावी.)
चोरी, मारी, देव त्याचें बरें करी.
चोरी होऊन माल जातो, त्याहून मेजवानींत जास्त खपतो.

चोरीचा माल घेतो तोही चोरच.
चोरीचा मामला, हळूं हळूं बोंबला.
चोरीचें लक्षण जन्मभर जात नाहीं.
चोरीस जाय असा नाहीं अर्थ, त्यास झोंप लागे स्वस्थ.
चोरीचे चौदा हात.
चौकशीअंतीं चूक कळते.
चौघांबरोबर मरण, वऱ्हाडासमान.
चौघांत जावें, चौघांसारखें व्हावें.
चौघांत चौघांसारखें व्हावें, उगें न रहावें.
चौघे यावे, चौदा आले, थोरपणाची रीत, परखे धाले पण घरवाले यांनीं गावें गीत.
चौदा विद्या चौसष्ट कळा परिपूर्ण.
चौदावें रत्न दाखविल्याशिवाय वठणीस येत नाहीं. [ ढणें.
चौऱ्याशीच्या फेऱ्यांत पडणे, तर हाल का-

## छ.

छ चावल, और नव परवाल पाणी.
छडी देई दान, तर गुरु कां फुंकी कान.
छडी लागे छम छम, विद्या येई घम घम.
छडीवर पडली सावली, आह्मांस विद्या पावली.
छत्तीसाचा आंकडा. ( वांकडें )
छत्र गेल्यावर कुत्रें सुद्धां विचारीत नाहीं.
छत्रीखालीं बाप मरावा, पण रहाटाखालीं आई मरूं नये.
छपन्न देशचें पाणी प्याला आहे.
छपन्न भाषा जाणतो. [ झाकला.
छपून जरी खून केला, तरी राहत नाहीं
छाटीवर काठी, संन्याशाची लोटी.
छाणमे ढेला डाले, आंगमे छिंटे पडे.
छाती करील त्याचा व्यापार.
छातीवर गुजारा.
छाती मोठी करणें.
छापखाना, भूतखाना.
छान छोक, पर मध्यें भोंक. [ णवी.
छानदारी बाहेर दाखवी, अंतरीं मूर्ख ह्म-
छाया देहातें सोडीना, कृती कीर्तीतें मोडीना.
छिद्र असें घरावरी, किरण पडे भीतरीं.
छिद्र सांगे ज्यास, त्याचा होय दास.
छेडूं नये निकरानें, न करावें शासन घाईनें.
छोटा मुंह, बडी बात. [ करी.
छोटीशी आगकाडी, पण जगाची रांगोळी

## ज.

जखम भरून येते, वण कायम राहतो.
जगन्नाथका भात, जगत पसारे हात.
जगाची वाणी, तीच ईश्वरध्वनी.
जगांतला मोठेपणा क्षणभंगुर.
जगीं सर्व सुखी कोण ? उ० विचारी
जतन तेथें पतन. [ णतें.
जन गर्विष्ठ नसतें, तर इतरा गर्विष्ठ न ह्म-
जन जनार्दन.
जन त्रिविध आहे.
जननमरण सर्वांला आहे [ देती.
जनामुखीं प्रगट कीर्ति, तिला विरळा दोष
जनांची ऊ, सोडीना, मारीना.
जनाचे तोंडीं लागतां पुरवत नाहीं.
जनाचे हातीं दोन धोंडे.
जनांत एक, मनांत एक.
जनाला गावें.
जन्म ज्याचा नीच उदरीं, त्यापासून सुखाची इच्छा न धरी.
जन्म दिला, पण कर्म नाहीं दिलें.
जन्म क्षणभंगुर, मरण अमर.
जन्मतां मूर्ख झाला, उपाय नाहीं त्याला.
जन्मतांना रडणें, वाढता चिंता वाहणें, मरतां निराशी होणें. [ मेला.
जन्मा आला हेला, पाणी वाहतां वाहतां
जन्मा उपर खाल्लें पान, थुंकतां थुंकतां गेला प्राण.

जन्माचा आरंभ, तोच मृत्यूचा प्रारंभ.
जन्माचा करंटा.
जन्मीं नाहीं, तें कर्मीं पाही.
जनीं निंद्य तें सर्व सोडून द्यावें, जनीं वंद्य तें सर्व भावें करावें.
जपेल त्याची लक्ष्मी, खपेल त्याचें शेत.
जपेल त्याची संपत्ति, करील त्याची व्युत्पत्ति, मारील त्याची तलवार आणि भजेल त्याचा ईश्वर.
जबरदस्ताचा खांद्यावर.
जबलग सास, तबलग आस.
जबान आगे खंदक नहीं.
जबान तले जबाब है.
जमदग्नीचा दुसरा अवतार.
जमाखर्च स्त्रीचे हातीं, ठेवावा ही व्यासस्मृति.
जमाखर्चीं न पडे ताळा, पंतीं कागद केला काळा.
जमात तो करामत.
जमीन अस्मानाचें अंतर.
जमिनींतून पाऊस पडत नसतो.
जय कीं मृत्यु.
जय होणें, हें ईश्वरी देणें.
जर कष्ट साही तर सुख पाही.
जर ती असती तर घरभर पोरें होतीं.
जर दारका सौदा है नेजरका खुदा है.
जर मृग साधला, तर वाण नाहीं पिकाला.
जल अग्नि उपयोगी, पण वाढवितां नाश करिती.
जलबिंदुनिपातने क्रमशः पूर्यते घटः.
जवळ नसून अर्थ, उगाच वाहे पुरुषार्थ.
ज्वानी आहे तोंवर, उधळेपणाचा पश्चात्ताप कर.
जवानोको चलाचलो, बुढीयाको बीयाहकी पडे.
जशास तसा भेटे, मनींचा संशय फिटे.
जशास तसा भेटे, खोट्याचें खरें न वाटे.
जशी जशी वेळ पडे, तसतसें करणें घडे.
जशी दक्षणा तशी प्रदक्षिणा.
जशी दानत, तशी बरकत.
जशी देणावळ, तशी धुणावळ.
जशी दैवाची उजरी, तशी बुद्धि उपजे शरीरीं.
जशी नाणेवारी चालते, तशी जगीं खुशामत वाढते.
जशी प्रजा वाईट वागती, तसे कायदे निघती.
जशी मैत्री वाढते, तशी ती दृढ होत जाते.
जशी शाळा, तशी बाळा.
जशी सृष्टी वाढते, तशीं मनुष्यें शहाणीं होत जातात.
जसा गुरु तसा चेला.
जसा देश तसा वेष.
जसा बाप तसा लेंक.
जसा भाव तसा देव.
जसा माल तसें मोल.
जसा मालक तसा सेवक.
जसा संत तसें दत्त.
जसें आंत तसें बाहेर.
जसें आलें तसें गेलें.
जसें काळचक्र फिरतें तसें मनुष्य वागतें.
जसें जिणें तसें मरणें.
जसें झाड तसें फळ.
जसें तुमचें मरणें, तसें माझें सती जाणें.
जसें द्यावें तसें घ्यावें (अगर उलट).
जसें दिसावें तसें असावें.
जसें पिकेल तसें विकेल.
जसें पेरावें तसें उगवतें.
जसें पेरावें तसें कापावें.
जसे लोक तसे गुरु.
जसें स्वप्न सृष्टि क्षणिक, तसें भय सुख क्षणिक.
जसें सोंग तशी संपादणी.
जहाके मुरदे, वहाही गाडते है.
जहां जाय भूका, तहां पडे सुखा.
जहाराके करतार, बोकोबालन बांको.
जहां सुई नही जाती, वहां मुसली चलाती है.
जहा सो वहा सवास्सो.

जळत घर भाड्यानें आणि जुने जोंधळे काढ्यानें घेऊं नयेत.
जळते घरचा पोळता वासा.
जळता पाया जाळणारा.
जळत्या घराचा वासा, नादाराचा एक पैसा.
जळांत राहून माशाशीं वैर करूं नये.
जळला तुझा अडका, माझा मूलच लाडका.
जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं.
जंगलमे मंगल.
जाईल तेथें हत्ती, नाहीं तेथें सुई आडती.
जाग्याला खूण, सासऱ्याला सून.
जागेल त्याची वाट, निजेल त्याचा टोणगा.
जाणतो तें सांगतो त्याबरोबर खोटेंही बकतो.
जाणून अपराध करी, त्यास क्षमा न करी.
जाणून अपराध करतो, त्याचा नाश रोकडा होतो. [हणा मूल.
जाणें कैसें कूळ, तोच जाणा शा-
जात कळती, पण मत कळत नाहीं.
जात खुदाकी वे अयब है.
जात तशी बात, पैसा तसा हाट.
जाती तशी पुती, खाण तशी माती.
जात वंजाऱ्याची बरी, कधीं चोरी न करी.
जातींमाजी विद्वज्जन, जात भूषणाप्रमाण.
जात्याची पुडी एकास तशीच दुसऱ्यास दिसे
जात्यावर बसलें ह्मणजे गीत सुचतें.
जातीची शिंदळ तिला कुंटण कशाला.
जातीनें हलके असती, ते हिमायत मोठी दाखविती.
जातीला जात मारी, जातीला जात तारी.
जातीस जात ओळखती, तसें चोरास चोर जाणती. [सोडावी.
जातीसाठीं माती खावी, जात कधीं न
जातें फुटलें आणि नातें तुटलें.
जाना अपने अखत्यार, आना पराय बस.
जामीन न होईए, गिराको दिजीये.
जामीन् रहा आणि गांठचें वहा.
जायाचें लेणें आणि लाजिरवाणें.
जारकर्मी मौजा मारी, तो उत्पत्तीची आशा न धरी. [आठवत.
जार, जामात, भगिनीसुत, हे उपकार नाहीं
ज्यार, जवाई, भानजा, येही तिन्हो नही आ-
जांवई शोध. [पना.
जांवई न्हाला, वाफा पाणी प्याला.
जांवयाचा बेटा, करडयीचा पेटा.
जांवयाची कीट.
जांवयाची जात, न्हाणींतलें खात.
जावेगा सो पवेगा खोवेगा सो सोवेगा.
जावें रगीनें, कीं जावें वगीनें.
जावे लाख, रहे साख.
जाशील बुधीं, येशील कधीं.
जिकडे गेली वांझ, तिकडे झाली सांज.
जिकडे धुगऱ्या, तिकडे उदेव उदेव.
जिकडे पुढा, तिकडे मुलुख थोडा.
जिकडे पोळी, तिकडे वळी.
जिकडे सुई, तिकडे दोरा.
जिकडल्या भिंती, तिकडल्या मुळ्या.
जिकिरीपेक्षां फिकीरी बरी.
जिचा नवरा दोसट, तिचा संसार चोखट.
जिची सहज लीळा, तिला कशाला भांगटिळा. [पिढीपाटलें.
जिच्या गळयात सरी गांठलें, तिला बसायास
जिचें घरीं ताक, तिचें वरती नाक.
जिचे मोठे कुले, तिला जन भुले.
जितके बोल बोलती, इतकें कार्य न करिती.
जितके मोठे, तितके खोटे.
जितना ओढना, उतना पाव पसरना.
जितना गूड डालेंगा, इतना मिठा होवेंगा.
जित्या नाहीं गोडीं, मेल्या बंधनें तोडी.
जित्या पितरा न मिळे अन्न, मेल्या करी पिंडदान.
जित्या रोटी, मेल्या माती.
जित्या हळहळे आणि मेल्या कानवले.

जित्याची खोड मेल्यावांचून जात नाहीं
जिधर मोला, उधर शहा दौला.
जिधर रब उधर सब.
जिन्नसाची उपयोगाप्रमाणें किंमत.
जिभेची करून लेखणी, शाईंत बुडवावी
अंतःकरणीं.
जिभेनें-बोले आणि टाळूवर आलें.
जिभेनें बांधली गांठ, न सुटे चाळवितां दांत.
जिभेला नाहीं हाड, बोलण्याची मोठी द्वाड.
जिभेला हाड नाहीं तरी दांत पाडते.
जिव्हा आणि लेखणी, मनाचें विवरण करी.
जिव्हा कटो, पण वचन तुटो.
जिव्हा ठेवावी स्वाधीन, तरी देहा न बंधन.
जिव्हा सर्वांच्या, नाहींत एका प्रकारच्या.
जिवंत असतां उपकार करी, आठवती ग-
त झाल्यावर.
जिवा तोंवर शिवा.
जिस तन लागे, वही जाने.
जिस बरतनमे खाना, उसमे छेद करना.
जिस शहरमे फूल वेचे, वहा धूल न उडाव.
जिसका खावे, उसका गावे.
जिसकी गोदमे बैठे, उसकी दाढी खिसोटे.
जिसकी जावे, ओही चोर कहावे.
जिसकी तेग, उसकी देग.
जिसकी लाठी, उसकी भेस.
जिंकतो तोच हंसतो.
जिंकण्याची आशा धरती, हारून मागें येती
जी कही लागत नही, जबदिल कधीं ल-
ग जाय.
जी खोड बाळा, ती खोड जन्मकाळा.
जीत ना मेली, हरळीची मुळी.
जीति मखी नही निगली जाती.
जीन घाली दोहों घोड्यावर, एक थकतां
दुसरा तयार.
जी वस्तु उपयोगी, ती चांगली वाटते.
जीव मरणाच्या चेष्टा, करतांना पावे अपेष्टा.
जीव जाईना म्हणून हातपाय खोडतो.
जीवन हें ईश्वरी देणें, मरण हें घेणें,
जीवा ठाई जीव नसतो, प्रीत लागते तेथें
असतों [गोडी.
जीविताची सीमा थोडी, पण त्यांत आहे
जीवो जीवस्य घातकः.
जीस डगालीपर बैठे, उसीको काटे.
जीस बहु वर्षें कष्ट, ती पत तत्क्षणीं नष्ट.
जीस मुखसे पान खांव, तिस मुखमे कोई-
ल नच्यावे.
जी स्त्री मूळची वाईट, जपून न होय नीट.
ज्या गांवच्या बोरी, त्याच गांवच्या बाभळी.
ज्या गांवास जाणें नाहीं, त्या गांवची वाट
कशाला विचारावी.
ज्या घरीं बळ असे वनितेचें, त्या घरीं
धिक् जिणें पुरुषांचें.
ज्यासाठीं लुगडें, तें उघडें.
ज्या गांवीं जावें, तैसें व्हावें.
ज्याचा नाहीं उपयोग, ते अर्धमोलीही महाग.
ज्याचा भार, त्याला जोजार.
ज्याचा हात खालीं, त्याच्या सुरकुत्या गालीं.
ज्याचा हात मोडेल, त्याच्या गळ्यांत पडेल.
ज्याची कळ त्याला.
ज्याची कोणाला आशा नाहीं तो गरीब.
ज्याची खावी पोळी, त्याची वाजवावी टाळी.
ज्याची खावी भाकरी, त्याची करावी चाकरी.
ज्याची चांगली कीर्ति, तो मेला तरी भूवरती.
ज्याची जिव्हा फार चालती, त्याची अक्कल
थोडी असती.
ज्याची नाहीं कोय, त्याची पुढली डोय.
ज्याची लागे चाड, तो उडे सात माड.
ज्याचें अन्न खावें त्याचें कल्याण चिंतावें.
ज्याचें असेल मढें, त्याला येईल रडें. [वाणी.
ज्याचें अंगीं नाहीं पाणी, त्याचा जीव मेल्या-
ज्याचे अंगची मस्ती, त्याचे अंगीं जिरती.
ज्याचे कपाळीं बाशिंग तो नवरा.

ज्याचा कंटाळा, त्याचाच वानवळा.
ज्याची कळकळ त्याला.
ज्याचें करावें बरें, तो म्हणतो माझें खरें.
ज्याचें कवाड ठेंगणें, त्यानें वांकून जाणें.
ज्याचें काम त्यानेंच करावें, इतरांनीं फजीत पावावें.
ज्याचें कुडें त्याच्यापुढें.
ज्याचें खावें, त्यास न निंदावें.
ज्याचें खिशांत सुरी, तो मंगळमूर्ती.
ज्याचे गळ्यांत सरी, तें सारी रात्र बोंकणी करी, पण ज्याच्या गळ्यांत दोरी, तो सुखें निद्रा करी.
ज्याचे गांठीं पैका, त्याचें ऐका.
ज्याचें चाकर व्हावें, त्यामागें चालावें.
ज्याचे जवळ अर्थ, त्याच्या अंगीं पुरुषार्थ.
ज्याचेजवळ अर्थ आहे, त्याशीं मत्सर करूं नये.
ज्याचें घर त्याला किल्ल्यामारखें.
ज्याचे घरीं काळी त्याची सदां दिवाळी.
ज्याचे घरीं माल, त्याचे हाल, कोल्हीं कुत्रीं पडती लाल.
ज्याचें चातुर्य त्याच्या पुरतें.
ज्याचें त्यानें नेलें, पाया पडणें वाया गेलें.
ज्याचे ज्याच्या परी, पुरवितो हरी.
ज्याचें त्याला, खटपट आम्हांला.
ज्याचें त्याला, गाढव ओझ्याला.
ज्याचें त्याला बरें.
ज्याचे त्याला नाहीं चाप आणि शेजाऱ्या [ येईना झोंप.
ज्याचे त्याला लखलाभ असो.
ज्याच्या तंगड्या त्याच्या गळ्यांत.
ज्याचे दांत त्याचे घशांत.
ज्याचें नशीब त्याच्याबरोबर.
ज्याचें नांव तें.
ज्याचे पदरीं पाप त्याला पोरीहोती आपोआप
ज्याचे पदरीं पाप, तो मुंबईला जातो आपोआप.
ज्याचे पदरीं नाहीं पैका, त्यास वाटे बोलतां शंका.
ज्याचे पदरीं संपत्ति, त्याचे आर्जव करिती.
ज्याचेपुढें धुपाटणें नाहीं, तो देव नाहीं.
ज्याचें पोट दुखेल तो ओंवा मागेल.
ज्याचे मनगटांत जोर तो बळी.
ज्याचें मन दुखविलें आहे, त्यावर विश्वासूं [ नये.
ज्याचे मागें अंगट नाहीं, तो गृहस्थ नाहीं.
ज्याचे मरण ज्या ठायीं तेथें जाई आपले पायी
ज्याचें लागावें त्याला द्यावें.
ज्याचें वेड, त्याला गोड.
ज्याचे हातीं ससा तो पारधी.
ज्यानें पाहिला नाहीं दिवा, त्यानें पाहिला [ आवा.
ज्या मुखी स्तुति, त्याच मुखीं निंदा.
ज्या राष्ट्रीं चहाडकानफुसे, तेथें प्रजेस सुख [नसे.
ज्यावबे लौंडे बह्माणपुरकी खबर लाव.
ज्यावर कुत्रें भुकतें तो चोर नव्हे.
ज्याला आहे भाकरी, त्याला कशाला [चाकरी.
ज्याला जोडा लागतो त्याला त्याचें दुःख.
ज्याला तोफेच्या आवाजाचें भय वाटतें, त्यानें समरांगणांत जाऊं नये.
ज्याला नाहीं कोणी, तो पडला वनीं.
ज्याला नाहीं अबरू, तो पडला गबरू.
ज्याला नाहीं अक्कल, त्याची खरोखर नक्कल.
ज्याला नाहीं प्रतिष्ठा, त्याची काय करावी थट्टा.
ज्याला पानाचें भय वाटतें, त्यानें वनांत [ जाऊं नये.
ज्याला बुद्धी नाहीं, त्याला भांडवल नाहीं.
ज्यास आहे चातुर्य त्याचें करिती आश्चर्य.
ज्यास कैसकरणी मिळाल्या त्यास बोंडकीचा काय पाड.
ज्यास सुख दुःख होतें, त्याला तें अनुभवतें.
ज्वानींत गुलाबी शेजेवर, म्हातारपणीं कांट्यावर.
ज्वानींत उमेदीची उडी, म्हातारपणीं थोडी.
ज्वानी तोंवर छानी.

जुन्नरी, हर हुन्नरी.
जुना ठक अज्ञानी नसतो. [ शरमेशी.
जुना स्वयंपाकी आळशी, नवा काम करी
जुनाट दुष्ट चांगला होत नाहीं.
जुनें हाड तें जुनेंच. [ करणें.
जुने हिशोब काढणें, नवे तंटे उपस्थित
जुन्या मित्रासवें क्रियानष्ट न व्हावें.
जुलमाचा रामराम.
जुलूम करितां लोकांवर, बदला येतो माघारा.
जुलूम चालतो तेथें शहाण्याचा वेडा होतो.
जुलूम पण गोड.
जुवानी दिवानी. [ करी मन.
जुवाबाजी रुपयांची पुळण, तेव्हांच गर्क
जुवाबाजी लोभाचें फळ, निराशेचें मूळ.
जे काई पण थाय, ते सारानेज वास्ते.
जे खाय ते सवाद जाणे.
जे जाती देवा, ते सगळे नव्हेत बोवा.
जें दिसे तें नासे.
जें देखलें नाहीं रवीनें, तें देखलें कवीनें.
जें न मिघे संबंधीं, तें मिघे जरबंदीं.
जें नाहीं दिल्लीं, त्याला कां यावें सुळीं.
जें नाहीं येत देतां, तें ना ह्मणतां नसे चिंता.
जें पिंडीं तें ब्रह्मांडीं.
जें फार भुंकतें, तें चावरें नसतें.
जे मननो बेर छे, ते कदाचज बीहशे.
जें मनाचें समाधान, तेंच रत्नांचें निधान.
जे माणस एकलो पण सांचो हशे तेना पक्षमां परमेश्वर छेज.
जें होय महजानें, तें न करी जुलमानें.
जेथें अग्नीचा वास, तेथें धुराचा प्रकाश.
जेथें अडचणी पडती, तेथें चतुराई धीर देती. [ असती.
जेथें अति प्रीति चालती, तेथें फार दोष
जेथें अधिक ज्ञान तेथें धर्म कमी.
जेथें आशा नाहीं, तेथें यत्न व्यर्थ.
जेथें आपलें धन, तेथें आपलें मन.
जेथें ईश्वर राहे, तेथें सर्व आहे.
जेथें कायदे फार, तेथें दोष अनिवार.
जेथें कांहीं नाहीं, तेथें मिळत नाहीं.
जेथें क्रोधाची चढती, तेथें बुद्धीची पडती.
जेथें खातो, तेथेंच हगतो.
जेथें खीर खाल्ली, तेथें राख खावी काय.
जेथें गांव तेथें म्हारवडा.
जेथें गाय व्याली, तेथें खूर खांडावे.
जेथें जाय दुःखी, तेथें न होय सुखी.
जेथें जावें, तेथें डोईवर दिवस.
जेथें जावें, तेथें नागराम फाळ.
जेथें दगड, तेथें धगड.
जेथें दुर्गुण वसतो, तेथें सूडही असतो.
जेथें दृष्टी, तेथें सृष्टी.
जेथें द्वेषभाव तेथें योग्यपणा नसतो. [आदर.
जेथें धनिकाचा सत्कार तेथें सुजनाचा थोडा
जेथें धान्याचा अभाव तेथें खाणाराचा प्रभाव.
जेथें नख नको, तेथें कुऱ्हाड कशाला.
जेथें नाहीं दाणा, तेथें लेंकरांचा भरणा.
जेथें पापाचा संभव, तेथें पुण्याचा अभाव.
जेथें पाया नाहीं खोल तेथें उंच बांधणी फोल
जेथें प्रतिष्ठा मिळवावी, तेथें अप्रतिष्ठा न करून घ्यावी.
जेथें प्रीति थोडी, तेथें बहूत खोडी.
जेथें फार खाणें, तेथें फार दुखणें.
जेथें फार देती, तेथें फार इच्छिती.
जेथें फार पुंजी, तेथें फार काळजी.
जेथें बुद्धि, तेथें शांति.
जेथें बुद्धीचें बळ, तेथें इच्छा नमून राहे.
जेथें भरला डेरा, तो गांव बरा.
जेथें भाव तेथें देव.
जेथें मिळत नाहीं, तेथें मागून फळ नाहीं.
जेथें मुडदे, तेथें गिधाडें.
जेथें राज्यकारभार, तेथें दरबार.
जेथें लढाई चालती, तेथें कायदे बंद होती.

जेथें लक्ष्मीचा वास, तेथें मित्राचा प्रवेश.
जेथें शब्दांचा सुकाळ तेथें बुद्धीचा दुष्काळ.
जेथें संतोष तेथें समाधान.
जेथें संशय दचका, तेथें दोष पक्का.
जेथें स्वच्छेनें आहे स्वारी, तेथें पाऊल हलकऱ्या परी.
जेना दाडा पाधरा, तेना आपे वांदरा. [खाय.
जेनुं काम तेनुं थाय, बीजाकरे तो गोता
जेपाळाची मात्रा वैकुंठीची यात्रा.
जेवढा गूळ मोडी, तेवढी वाढे गोडी.
जेवढा व्याप तेवढा संताप.
जेवढी करणी तेवढी भरणी.
जेवढें उंच चढावें, तेवढें खालीं पडावें.
जेवढें धन तेवढें बंधन. [ नाहीं.
जेवणाएवढा लाभ नाहीं, मृत्यूएवढी हानि
जेवणांत लाडू, हत्यारांत माडू आणि मोऱ्यांत माडू. [ लागते.
जेवरे पुता वाटींत, ह्मणे मला नरटींत गोड
जेवल, हातीपायीं डेवल.
जेवल्यावर ह्मणे जात कोण.
जेवायला आधीं, निजायला मधीं, कामाला कधींमधीं.
जेवायला गेला तिकडे तोंड विसरून आला.
जेवायला चला, ह्मणे भूक नाहीं मला. [कर.
जेवून बसावें क्षणभर, गर्त्री जेवल्यावर फेरी
जेवा वड तेवा टेटा, ने बाप जेवा बेटा. [वाढे.
जेव्हां गाढव शिंडी चढे, तेव्हां स्त्रियांस ज्ञान
जैसेकु तैसा बाबुका पैसा.
जैसा कामकरी तसें काम करी.
जैसा दाम वैसा काम.
जैसा बोना तैसा उगाना.
जेहेवा देश वेहेवा भेस.
जो आहे बहु भोळा, त्यावर ठकाचा डोळा.
जो ईश्वरास मानतो, तो धर्मात्मा असतो.
जो उसने मागतो तो दुःखी होतो.
जो करतो तो खाड्यांत पडतो.
जो कळ सहन करतो, तो एक वेळ दुःखी होतो.
जो करी सदा धंदा, त्याचा लाभ असे बंदा.
जोखमांत उडी घालतो, तो धक्का खातो.
जो खाय गा खाक, उसकी होयगी राख.
जो गरजता है सो बरसता नही.
जो गुण बाळा, तो जन्मकाळा.
जो गुळानें मरतो, त्याला विष कशाला.
जोग्याचें करडूं लाडकें.
जोग्यानें कमावलें आणि कुत्र्यानें खाल्लें.
जो घाबरतो तो रानभरी होतो.
जो चढेगा सो गिरेगा.
जो जन्मास घालतो तो भाकर देतोच.
जो जवळ आयरा तो जगसोयरा [विसरतो.
जो जातांना त्वरा करतो, तो घेतांना कांहीं
जों जों तोता पढे, तों तों पिंजरेमे पडे.
जों जों भिजे कामरी तों तों भारी होय.
जों जों मावळ तों तों चावळे.
जो ठेंचा खातो तो हुशार होतो.
जोडीवांचून गाडा ओढला जात नाहीं.
जोड्याची अर्णी, पागोट्याची बिनी, पण घरची बायको बटकीवाणी.
जो तो आपापले घरचा राजा.
जो तो आपले घोडें पुढें ढकलतो.
जो तो आपलें हित पाहतो.
जो थोडें बोलतो तो शहाणा असतो.
जोंधळकुट्या आणि नांगरगळ्या.
जो नजर न आवे सो भुलजावे.
जो निगुऱ्या त्याचें तोंड सकाळीं पाहूं नये.
जो बहू इच्छा करतो, तो अडचणींत पडतो.
जो बायकोशीं चांगला, तो खाई दहीकाला.
जो भाषण करीत नाहीं, तो कांहीं जाणत नाहीं.
जो भ्रमण करतो त्याला संसार नसतो.
जो मनुष्य कर्जदार त्याला नेहमीं शब्दमार.
जोरू सांथ पैसा गांठ.

जोंवर आहे दामाजी, तोंवर हांजी हांजी.
जो वर पाहून चालतो तो खाड्यांत पडतो.
जो विजार शिवील तो हगायला भोंक राखील.
जो शिक्षा करूं पाहतो,तो कल्याण चिंततो.
जो मगरा पडला, तो स्वभावच जडला.
जो स्पष्टवक्ता तो कपटी नसतो.
जो स्वतः नम्र, तो हुकूम करण्याला योग्य.
जो हंडीस होगा सो रकाबीस आवेगा.
जो हरघडी शपथ घेतो, तो घातच करतो.

## झ.

झगडा तोडी मैत्री. [म्हणजे फुकाची.
झांकली मूठ सव्वा लाखाची. उघडली
झांकलें पाप दुणें दुराचरण.
झांकलें माणीक, बुद्धि आणीक.
झाड थोडें वरवी मग तें कापवी.
झाड पाहून घाव, मनुष्य पाहून शब्द.
झाडाची परीक्षा फळावरून.
झाडाचीं फुलें झाडाखालींच गळतील.
झाली गोष्ट परत येत नाहीं. [दुःख देते.
झाली जखम भरून येते, अपयश मोठें
झाली जरा प्राप्त, शोभत नाहीं लालवस्त्र.
झाल्यावर न्याय, मग वाद सांगणें तें काय.
झाल्यावर पोटभरी, बरवें गायन करी.
झाले केश श्वेत, बुद्धी नाहीं येत.
झालें तें झालें, न झालें तें होणार नाहीं.
झालें तें पुरवतें, अवई मोठें दुःख देते.
झुकेल तो चुकेल.
झूटा खाय मीठेके लालच.
झूटा न बोले तो पेट फुले.
झूटें के आंग सच्चा रंग संग.
झूटें भांडें अर्धा लाभ.
झूठा झूटेसे बुरा जो सोनेका होय.
झूठेका मूंह काला सच्चेका बोलबाला.
झोटिंग बादशाही.
झोंप दरिद्राची सोयरी.

## ट.

टक्का करी काम.
टर्र भर्र दमडी खर्र. [धा चोर.
टाकमटिका डामाडोल, आणा दोर बां-
टांका आगळें लिहावें, थोंमा उणें जेवावें.
टांकीचे घाव सोसल्याविना देवपण येत नाहीं
टाळाटाळी करणें, तें समय चोरणें.
टिकोबा टिकाई, विठोबा रखुमाई.
टिटवी यमाची तरळीण.
टिळेपट्टे नायकाचे, घरीं हाल बायकांचे.
टुकटुक माकड, तूं खा मकुड, मी खातों पापड.
टोणग्याचे कपाळीं दसरा.
टोणग्याचे कानीं वाजविली किनरी, तो म्हणे माझी दोंयच बरी.
टंगळमंगळ भाव. [हारवाडा.
टांचा टुंचा चांभारवाडा. सदा घाण डो-

## ठ.

ठक ठकाला फसवील तो इतरा कां न ठकवील?
ठकबाजीसे, घर नहीं बसता. [खुष.
ठक पडतो आपले फशीं, सर्व पाहून होती
ठकपणा दोन दिवस, खरेपणा बहुवस.
ठकपणाविना,ठकसानी कीं कांहीं होत नाहीं
ठक, महा ठक आणि निवारण्या.
ठक लोकांशीं व्यवहार, ठकतो लोक सोर
ठकवणीचा खेळ, होत नाहीं सफळ.
ठकवितात तेच सत्यवादी म्हणवितात.
ठकाला ठकविणें हें योग्य करणें.
ठकाला महाठक भेटला.
ठठं ठठं ठं ठठठं ठ ठंठः. [आळोआळ.
ठणठणपाळ फुटकें कपाळ, भिक्षा मागे
ठणठणपाळ, मदन गोपाळ.
ठाक ठाक बोहणी चोख.
ठेंच लागल्यावांचून स्मरण होत नाहीं.

ठेवावी चांगली संगत, गणले जाल त्या संख्येंत.
ठेवितां उघडें कवाड, चोरीस मिळते सवड.
ठेवितां चांगली रिती, दैवगती उघडती.
ठेवितां मोठी चाल धरीं,पिशवी लहान करी.
ठेवी पोट साफ, पाय उष्ण, नेहमीं गार मस्तक जाण: मग वैद्याची गरज, सोड हित तेंच समज.
ठेवी मन स्वाधीन, गेह प्रगट डौलानें.
ठेवीवरचे भुजंग वाटेवरचे मांग सारखेच.
ठेवी सद्गुणी संगत ती गेह अखंडीत.

## ड.

डगशील तर बवशील काय.
डाईस गेला, पैसा आला.
डाग जातो, खोड राहतो. [ म्हणा.
डाग झाला जुना आणि सला पतिव्रता
डामडौलें कुटुंबाची हानि, चांगले रितीची नुकसानी.
डाव असतां हात भाजूं नये.
डाव डाव कचक्या कुमारी कचक्या. आमचा डावक्या कोठें गेला.
डाह्या दीकरो, देशावर भोगवे.
डाळरोटी, सब बात खोटी.
डोई धरला तर बोडका, हातीं तर गेडका.
डोई मोठी, अक्कल थोटी.
डोक्यावरचें ओझें खांद्यावर येणें.
डोक्यावर पदर, दिल्लीवर नजर.
डोक्यावर मिरें वाटणें.
डोकें कि फोकें.
डोसी मरी पोरी आवी.
डोहळ्यावरून मुलाचें लक्षण ओळखावें.
डोहाचे ठिकाणीं डोहच पडतील, निवळ जाईना आणि गढूळ येईना. [ नसावा.
डोळा काणा असावा पण मुलुख काणा
डोळा तर फुटूं नये,काडी तर मोडूं नये. [आहे.
डोळ्या अवलोकन साहे, जिवा तसें मन
डोळ्या आड स्मशान पाड.
डोळ्याकानाचें अंतर, चार बोटांचा फेर.
डोळ्याचें तें खरें, कानाचें तें खोटें.
डोळ्यांत धूळ टाकणें.
डोळ्यावर कातडें ओढणें.
डोळ्यावर धुर येणें.
डोळे आल्यावरी, प्रकाशाचा त्रास करी.
डोळे काढिले आणि कपाळ हलकें झालें.
डोळे झांकून द्यावें दुकानदारानें, चौकशी करून घ्यावें घेणारानें.
डोळे फुटले तरी हिशेब बुडत नाहीं. [नाहीं.
डोळे मोठे केले म्हणून मी आंत मावणार
डोंगर कोरून उंदीर काढला.
डोंगरचे आंवळे व समुद्राचें मीठ.
डोंगरास दुखणें व शिंपींत औषध.

## ढ.

ढवळलेल्या पाण्यांत, मासे धरावे निवांत.
ढवळ्याशेजारीं बांधला पवळा, वाण नाहीं पण गुण लागला.
ढुंगण पाहून पाट, तोंड पाहून टिळा.
ढुंगणाखालीं आरी, चांभार पोरें मारी.
ढुंगणास हात पोहोंचले.
ढेकूण मारायला तलवार कशाला?
ढेकणाच्या संगें, हिरा भंगे.
ढेकणासारखें रगडून टाकणें.
ढेंगा घालून जाणें.
ढोंग केवढें, तर घोडनदी एवढें.
ढोंग धतोरा हातीं कटोरा.
ढोंगी एक तऱ्हेचे प्राणी, ती नसे ईश्वरकरणी.
ढोंगी वेष धरतो; शेवटीं उजेडास येतो.
ढोलक्यास दोहींकडून थोबाडी.

## त.

तर्कः शक्रश्च दुर्लभम्.
तगवी तिला भगवी, फाडी तिला साडी.

तडीचं पोहणार.
तन गेलें,मन गेलें, म्हातारपणीं न्हाण आलें, मरमडाचें मखर केलें, तेंही वाऱ्यानें उडून गेलें.
तन मन धन गुरुला अर्पण.
तपेलिकी लांब दोरी, तपेलें संभाळ पोरी.
तयार ठेवी चरकी चाती, कापूस देणें ईश्वराहातीं.
तरणीचे गाल आणि म्हातारीचे हाल.
तरवार पाजरली आणि वरच्या म्हातारीवर गाजिवली. [ सुखाभंगी.
तरुणपणीं जो व्यासंगी, तो म्हातारपणीं
तरुणपणीं नम्र होशी, वृद्धपणीं मान घेशी.
तरुणपणीं बुद्धि, म्हातारपणीं शक्ति, याचें नांव चांगली स्थिति.
तरुणपणीं रक्षावें, म्हातारपणीं खर्चावें.
तरुणपणीं राग येतो इतका वृद्धपणीं नमतो, चाळवून आला असतां नाहीं होत कमता.
तरुणपणीं लाज, म्हातारपणीं खाज.
तरुणपणीं शिंदळकी, म्हातारपणीं कुंटणकी.
तरुण फार मरतात, नंतर म्हातारेही जातात.
तरुण वकील, वृद्ध वैद्य.
त्वयार्धं मयार्धं.
तवईपेक्षां आवई कठीण.
तवेवर तेरी हातपर मेरी. [ रपा खरी.
तस्मात प्राक्तनेंर समस्त बलिया ललाट
तहान लागल्यावर विहीर खणणें.
तहान लागल्यास मूत प्याला, तो भूक लागल्यास विष्टा खाईल.
तळव्याची आग मस्तकास गेली.
तळव्यास लोणी आणि नेत्रास थंडी.[नाहींत
तळाशीं पोहोंचल्यावांचून वर बुडबुडे येत
तळहातांतला फोड.
तळहातानें चंद्र झांकत नाहीं.
तळहातावर मेखा सोसणार.
तळीं भोंक, वर झांकण.
तळें राखील, तो पाणी चाखील.
तळ्याच्या आशेनें सुसर मेला.
तृप्त ज्याचें मन, तो सधन.
ताक तें ताक व दूध तें दूध.
ताक नाशी भाजी, वर नाशी शेजी.
तांक ना भात ना आंळवांची देठीं.
ताकांत पडली माशी, सून कांहीं पिईना, गिऱ्हाईक कांहीं घेईना.
ताकादुधाचा निकाल होईल.
ताकापुरतें रामायण.
ताकाला जावें, मग मडकें कां लपवावें.
ताकानें पोळला तो दुधानें पोळेल.
ताकास तूर लागूं न देणें.
ताज्या घोड्यावरच्या गोमाशा.
ताटाखालचें मांजर.
ताटाबरोबर कांठही जातो.
ताटांत जेव तर म्हणे खापरांत जेवीन.
ताटांत सांडलें काय व वाटींत सांडलें काय. [ उभी राहो.
ताडाची सावली, घडीची बाई, आंब्याखालीं
ताडीच्या झाडाखालीं जरी दूध प्यालें तरी ताडीच प्याल्याचा संशय येतो.
ताडी पाळी तो यजमान, करी तो दुस्मान.
तांत बाजे, और राग बुझे.
तांदूळ जिवसे, पाहुणा जिवसा.
तान्हीला लावा वनीं व पारठीला लावा थानीं.
तान्हेली गाय, चिखल खाय.
तान मे तान हिंदुस्तान, और सब गलतान है.
तापट प्रकृतीचा असतो तो उतार वयाचा दिसतो.
तांबड्याचे आशेनें पाढरें हरवावें.
तांब्या पालथा घातला.
ता म्हणतां ताकभात समजावा.
तापल्या पाण्यास चव येत नाहीं.

तारळें शाहरं, बहु गुलजारं तारळीचे तीरीं,
भक्ती नवलाईची सारी.
तारुण्यांत आली तरी बाळदशा नाहीं गेली.
तारुण्यांत विलास, वृद्धपणीं वनवास.
तारुण्यांत स्वमैश्वर्य कळे, तर मर्दा सुख मिळे
तारू कांठ्यावर असतें तेव्हां परीक्षा काय
होणार. [ मागर्वी.
तासाआड बैल आणि दिसा आड वायको
त्याचा बाप तोच.
त्याचें बोलणें भाजीपाला.
तिघांचीं तीन दारें.
तिघांत न तेरांत, ना शेरभर सुतळींत.
तिघावरचा आग, लावील कोण थाग. [खळी
तिघावरची किकळी आणि वराचा वांसा नि-
तिरका डोळा, गुणाचा पोळा.
तिरस्थळी यात्रा.
तिल तडके, दिन भडके.
तिळभर दुखणें, मणभर कुंथणें.
तिळा इतकें नातें व गगनाइतकी मैत्री.
तिळभर चतुराईचें मोल, शेरभर हुन्नरचें तल
तीथ आहे तो भट नाहीं, भट आहे तो
तीथ नाहीं.
तीर्थीं गेल्यावांचून मुंडण होत नाहीं. [खीच.
तीन कोनी टोपी जिकडे फिरेल तिकडे सार-
तीन, तिकट, महा बिकट.
तीन तेरा, नऊ बारा.
तीन गरव बाकीचा खुर्दा.
तीन टक्के जमा, त्रेपन्न टक्के उचापत.
तीन शेंडे साबर बोंड आणि लाल तोंड
हे वाढल्यावांचून राहणार नाहींत.
तीनही ढकलून राम. [बोला.
तीळ खा तिळा गुणीया, गूळ खा गोडसें
तीळ तीळ जीव तुटतो. [ तें पहावें.
तुका ह्मणे उगेंचि रहावें जें जें होईल तें
तुका म्हणे ऐशा नरा. मोजून मारव्या
पैजारा.
तुका म्हणे करून दावी, त्याचे पाय माझे
जिवीं. [ गबाळाचें काम नव्हे.
तुका म्हणे येथें पाहिजे जातीचे, येर
तुका म्हणे भोग सरे गुणा येती अंगारें.
तुझा बा कांदे खाई, तुझी आई सोलून देई.
तुझ्या बाची काळी गांड.
तुझें तें माझें, माझें तें माझ्या बापाचें.
तुझें माझें पटेना, तुझ्यावांचून गमेना.
तुटलें मन आणि फुटलें मोतीं सांधत नाहीं.
तुटली मैत्री जडली जाती, अखंडित चा-
लत नसती.
तुपाचे आशेनें उष्टें खाणें. [कातीचे कसे.
तुमचें कर्महो असो पण आमचे तीळ सं-
तुमबी चुप हमबी चुप. [ नका लावूं.
तुह्मी आम्ही भाऊ, गाठोळ्याला हात
तुरीची काठी तुरीवर झाडावी.
तुरीबरोबर बरड चिरडतो.
तुरुत दान, महापुण्य.
तुला न मला, घाल कुत्र्याला.
तुस कांडून हातास फोड.
तुळशीचे मुळांत कांदा लावूं नये.
तुळस उपटून भांग लावणें.
तूं इमानसे गांव, हम सोता है.
तूं कर कटकट, मी आहे निबरघट्ट, माझा
गुरु बळकट. [ असतील.
तूं नाहीं तर तुझ्या बापानें शिव्या दिल्या
तूप साखर रेडका आणि भाजीपाला धडका.
तूं फिरलास आडोझाड मीं फिरलों पानो-
तूं मला तर मीं तुला. [ पान.
तूं मी मारखी, चल जाऊं द्वारकी.
तूं मुझकु, तो मै तुझकुं. [ कोणी.
तूं राणी, मी राणी, गांडीवर पाणी घालावें
तूं रानोरान तर मी झाडोझाड.
तूं स्वयंपाक कर, मी जेवेन, तूं अंथरूण
घाल, मी निजेन, आणखी काय मदत
पाहिजे.

तेच म्हणावे सुजन, ठेविती भोग निजाधीन.
तेरड्याचा रंग तीन दिवस.
तेरे उपर मेरा पाव, थोटा म्हणे मी गव.
तेरे पितर मडक फू.
तेलकरी रडे आणि नारळकरीही रडे.
तेल गेलें, तूप गेलें, हातीं धुपाटणें आलें.
तेल जळे, पिडा टळे, ज्याचें जळल्याला कळे.
तेल तूप एक, पेंड गैबानीं.
तेल पाहिजे दिव्याला, बैल धरी घाण्याला.
तेलवालीचें दुणावलें, मीठवालीचें गमावलें.
तेलीण रुसली, अंधारांत जाऊन बसली.
तेलीण सांचवी धारोधार, खुदा नेई एकच वार.
तेल्याचा बैल सदा आंधळा.
तो औषधाप्रमाणें बोलतो.
तोंड करी बाता, ढुंगण खाई लाथा.
तोंड गोड असलें म्हणजे मनुष्य काशीहून रामेश्वरापर्यंत जातो.
तोंडचा गोड व हातचा झोंड ( जड ).
तोंड चोपडा मनांत वांकडा.
तोंड पोरीचें, भोंक मोरीचें.
तोंड फिरे तिकडे अवदसा फिरे, हात फिरे तिकडे लक्ष्मी फिरे
तोंडभर विडा.
तोंड बांधून बुक्क्यांचा मार.
तोंड वांकडें पण दैव फांकडें.
तोंडांत घास, मानेस फास.
तोंडापरीस जबडा थोर.
तोंडावर गोड, मनांत फोड.
तोंडावर हात फिरवणें, कसें करून फसविणें.
तोंडासारखा सारथी जवळ असल्यास काय कमी.
तोंडीं करतां आदरमान, श्रम न करितां [ बहुमान.
तोंडीं तीळ, गांडीं बुधला.
तो पाप देणार नाहीं तो पुण्य कोठून देणार.
तोरा सरदारीचा व उजेड मणकाडीचा.
तोलदारीचा हेवा व मणकाडीचा दिवा.
तोळा मुखत्यारीचें मोल, शेरभर चतुराई ममतोल.
तो जातीचा रंगारी मनास वाटेल तसें करी.
तंटा तुटण्याअंतीं दोघांची हानी होती.
तंबाखू दीयते दानं, बटवाद्यानं विशेषतः .
तृणतुल्य पुरुष जरी, सधन स्त्रीच्या बरोबरी.

## थ.

थट्टा आधीं गोड, मग कडू.
थट्टा करून बक्षिस करी, न देण्याची बरोबरी.
थट्टा आधीं करूं नये, मग बोंब मारूं नये.
थट्टा निकरानें करितां, मैत्री विषप्राय वाटतां.
थट्टेची होते मस्करी आणि मस्करीची कुकुस्करी.
थट्टेच्या लबाड्या, त्याच दुःखाच्या उड्या.
थट्टेत शब्द खरे खोटे खोलतां कांहीं न वाटे.
थळीचें गुरूं आणि कुळिवंताचें लेंकरूं.
थयाशिवाय थयु, एम जलदी बोलशूं.
थयुं तें थयु न थयु तें थाय नहीं.
थिल्लर आणि गोदावरी केवी पावे बरोबरी.
थेंबें थेंबें तळें सांचे.
थैक म्हणतां ब्रम्हहत्या.
थोडथोडें समयीं खातो, तो सदां पुष्ट होतो.
थोडा खाना, बनावर्स रहना. [ मिळतो.
थोडा बहू सत्कार होतो, त्यास सर्वांमान
थोडी अक्कल ठेवी, कामें बहूत मिळवी.
थोडी ममता लावावी, फार वेळ चालवावी.
थोडी हयगई करणें, नुकसानी करून घेणें.
थोडें असतां लवकर सुधारतें, थोडी वस्तु लवकर खपते. [इच्छा न धर.
थोडें आहे त्याचा भोग कर, अधिकाची
थोडें थोडें पाप करी, तो मोठेंही आचरी.
थोडें बोलणें, बहूत करणें.
थोडें वाचणें बोलणें, बहू शोधणें ऐकणें, सर्व मनांत राहणें.
थोड्यांत गोडी, फारांत लबाडी.

थोड्यानें उदार व बहुतानें कृपण.
थोर घरीं लेक द्यावी, भेटायाची शिराणी.
थोर गृहस्थ द्रव्यावीण, जैसा योद्धा शस्त्रहीन. [ योगानें.
थोरपणा येतो दैवानें, सभ्य न होय त्या
थोरपणा राखणें तर याचना न करणें.
थोर लोकांच्या वकवा,लोक ह्मणती वाहवा
थोर घरचें श्वान, त्यास सर्व देती मान.
थोराच्या पाठबळावर लोकांवर जुलूम.
थोरानें भक्षिलें तें औषधासाठीं, गरिबानें भक्षिलें तर पोटासाठीं.
थंड काळजानें मूड घेणें,हें दुष्टाचें आचरण.
थंडी गेली, वेडी केली.
थंडीस वेडी, चैनीस रंडी.

## द.

दखनेंमें और मुलखमें चार उंगलका फरक.
दगड आणि धोंड.
दगड तासून पाझर फुटत नाहीं.
दगड बारा वर्षें पाण्यांत राहिला तरी कोरडाच.
दगड मारून हात लपविणें. [ नाहीं.
दगडाकडे पाहून खालचा विंचू दिसत
दगडाखालचा हात युक्तीनेंच काढावा.
दगडापासून रक्त निघत नाहीं.
दगडापेक्षां वीट मऊ.
दगडाचा देव होत नाहीं. [ खळखळ.
दगडाचें देव पाहतां खळखळ, काढतां
दगडाचें नांव धोंडा, धोंड्याचें नांव दगड.
दगडाचे नाविक.
दगडाला पान्हा आणणें.
दगडी आपटल्यानें भीति नाहीं.
दगा, ठकपणा, यांना असतें बहुधा त्वरा.
दगा नाहीं किसीका सगा.
दत्त ह्मणून उभा.
दम कोता और घुस्सा बहुत.

दमडी ठेवतां संभाळून, रुपया जाई खर्चून.
दमडी रोकडी, कंबर कां वांकडी.
दमडीचा चाकर, लाखांचा बेकार.
दमडीचा सौदा, येरझारा चौदा.
दमडीची वरू, कोठें घेऊन फिरूं.
दमडीची मणकाडी, लाख रुपयांची हवेली.
दमडीच्या कोंबडीला चार आण्यांचा मसाला.
दमडीचें घेणें आणि खंडीचा भाव.
दमडीचें तेल, सारी रात्र दिवा, उरलें सुरलें माझ्या झुलपाला लावा.
दमडीवर झिमडी.
दमडीसाठीं मशीद ढासळूं नये.
दया उधार सत्ता रोकडी.
दया नाहीं ठाऊक, त्याला म्हणावें खाटीक.
दया मांसाशिनः कुतः.
दयेसारखा धर्म नाहीं.
दर्जीका बेटा, जबलग जीवे, तबलग सीवे.
दयाजवळ दुःख सांगावें.
दर्पण आंधळ्याकरीं,देतां न होय उपकारी.
दर एक गांवीं एक एक घर बांधावें.
दर कुच दर मुक्काम. [ कर.
दरबारीं आपला हितकर तो पैशाचा चा-
दरबारीं मान, विड्याचें पान.
दरबारीं सर्वांशीं बरें वागणें, तर फार दिवस टिकणें.
दरसन थोडा, दिमाख बडा.
दर्यांस खसखस.
दराची माती दरास पुरत नाहीं.
दरिद्री चाले दर्याकू, दरिद्र चाले साथ, मोतीखातर डुबी मारी, शंख लागे हाथ.
दरिद्री साऱ्यांचा मेहुणा. [ करना.
दरियामें रहना और मगर मच्छीसे बैर
दरिद्राची उत्पत्ती, आळशांची संगती.
दरिद्र्याची मूठ उघडली आणि झांकली सारखीच.

दरिद्यास खोड असूं नये.
दरिद्रेषु मनुष्येषु प्रभुत्वं कुरुते धनी.
दलालाच्या अंगावर घोडे पडत नाहींत.
दशा घरोघर सारखी.
दशा फिरती सोन्याची माती होती.
दसकी लकडी एकका बोजा.
दस गये और पांच रहे. [ रखना.
दसघर भीक मांगना और एक मशालजी
दसरा आणि घसरा.
दसऱ्यांतून जगूं तेव्हां दिवाळी बघूं.
दहा गोष्टी ऐकाव्या, एक खरी निवडावी.
दहांचा हात वैऱ्यावर पडूं नये.
दहा बारा कोशांवर भाषा बदलते. [ नये.
दहा मरावे पण दहांचा पालनवाला मरूं
दही खावूं मही खावूं.
दही खाणाराचें गळ्याकडे कचरतें. [ला.
दळतांना पट्टा पडला, म्हणे मी भला वागवि-
दळा, कांडा करावा आणि शिनळांचीं पोटें
भरावीं.
दळांत हत्ती, बागांत सुरू.
दळील तो भरील, करील तो पावेल.
दक्षिण वायु सुटे, पाऊस घेऊन उठे.
द्रव्य अधिक मानतात ते गुण कमी
जाणतात. [आणिती.
द्रव्य आणि चांगल्या रीती सभ्यपणा
द्रव्य आणि समाधान अंगाला कांती
आणितात. [ सोय.
द्रव्य असल्या बहु भय, नसल्या नसे
द्रव्य असतां भय प्राप्त, नसल्या दुःख व्याप्त.
द्रव्य आणि समाधान उभयतां राहतां कठीण
द्रव्य ज्याचे हातीं, त्याची करिती भक्ति.
द्रव्य झाल्या गांठी, आठवती मोठ्या गोष्टी.
द्रव्य, चतुराई, कीर्ति एकावी, चतुर्थांश
खरी मानावी. [ प्रयास.
द्रव्य मिळण्यास आयास तितके रक्षणीं
द्रव्य फैलावल्याशिवाय वाढत नाहीं.
द्रव्य देऊन मित्र जोडे, समयीं उपयोगीं
न पडे. [ दुखणेकरी.
द्रव्य नाहीं ज्याच्या पदरीं, तो अर्धा
द्रव्य देवता समान मान्य. [ राहत नाहीं.
द्रव्यव्यय करितां येत नाहीं, त्याजवळ द्रव्य
द्रव्यबळ चांगलें, अंगबळ पांगळें. [ द्वारीं.
द्रव्यशक्ति सर्वांवरी, चालत नाही स्वर्ग-
द्रव्यसंग्रह आहे पुरा, तर प्रगट राहे घरा.
द्रव्य येतां मूर्खा हातीं, मूर्खपणा वाढे अती.
द्रव्यहरण प्रीति, तीच पापोत्पत्ति.
द्रव्यवानाला दूषण नसतें.
द्रव्यवान बोलती, सर्व मौन धरिती. [लक.
द्रव्यवान असतां मूर्ख, शहाणा त्याचा मा-
द्रव्यवान खातो पितो, देव गरिबालाही देतो.
द्रव्यवान कर्ज मागतो, सर्व नेऊन देती.
द्रव्य वाढतें, शरीर क्षीण होतें. [शोभत नाहीं.
द्रव्याचा उपभोग घेत नाहीं त्यास लक्ष्मी
द्रव्याची अव्यवस्था, श्रीमंताची दीनावस्था.
द्रव्याजवळ द्रव्य जातें, दरिद्र्याजवळ दरि-
द्री जातें.
द्रव्याचे लालचीनें पेंढीचें ढोर. [ गेली.
द्रव्यापरी द्रव्य गेलें, बायकोपरी बायको
द्रव्यापेक्षां कीर्ति, लोक पसंत करिती.
द्रव्यापेक्षां मनीं, सत्य अधिक मानी.
द्रव्यापेक्षां विद्याधन, योग्य पुत्रा समान
द्रव्यापुरती इच्छा, इच्छेपुरतें धन.
द्रव्याशा धरिती, मूर्खाशीं लग्न लाविती.
द्रव्यावीण हिंमत धरी, त्याचा नाश
होय भारी.
द्रव्येण सर्वे वशः
दृढ छाती, सूक्ष्म दृष्टी, मृदु हात जाणे,
अशीं असावीं शस्त्रवैद्याचीं लक्षणें.
दृढभाव तोच देव.
दृष्टी आड सृष्टी.
दृष्टी मोठी पोट लहान.
दृष्टीस पडतां नावडे, इच्छा न होय त्याकडे.

दृष्टी समोर नमतो त्याचा विसर पडतो.
दाईके आगे पेट किया छपाना. [ घाल.
दाट झालें पाणी घाल, पातळ झालें पीठ
दाढी धरून पाय तुडविणें.
दाढी पाहून वाढी.
दाढीला आग लाविती, नाश करून घेती.
दाढीला आग लागली, म्हणे माझा दिवा लावून घेऊं द्या.
दाढीवाला सांडला आणि शेंडीवाला धरला.
दाढीस वेगळें आणि डोंडीस वेगळें कोण देतो.
दाणा दाणा टिपतो, पक्षी पोट भरतो.
दांत आपले, ओंठ आपले
दांत कोरून पोट भरत नाहीं.
दांत दाखवून अवलक्षण.
दांत नाहीं मुखांत, विडा घाली खिशांत.
दातृत्वानें शत्रुचे मित्र आणि अभिमानानें मित्राचे शत्रु होतात.
दाता दे भंडारिका पेट फटे.
दांतावर मांस नाहीं.
दांतास दांत लावणे. [ ना फिर्याद.
दादल्यानें मारलें, पावसानें झोडलें, दाद
दादल्यापरीस वाईल मोठी. मुसळ धेऊन लागे पाठी.
दादा अंगीं वहिनी सोयरी. [ बाळांचा बाप.
दादा, दादा, मारमाप म्हणे मीं लेकरा-
दादा रामराम, बाबा रामराम.
दादाची किल्ली वहिनीजवळ.
दादाचें बळ वहिनीस माहीत. [ जरा.
दादा, बाबा, मला करा, पण ठकवूं नका
दादा बैल, धाकटा कांहीं तरी होईल.
दान धर्म करितो तो ईश्वरास आवडतो.
दानधर्म किल्ली, स्वर्गद्वार उघडली.
दानधर्म फार करतो तो कृपण.
दानधर्माची आई जाणे चतुराई.
दान गरिबी येईना, द्रव्य चोरीतें जाईना, द्रव्यानें शहाणा होईना, अलंकारें मान मिळेना.
दानेको टापे, सवारीको पादे.
दाम करी काम, बिबी करी सलाम.
दाम दुप्पट, कण तिप्पट.
दामी रूठा बाजोंस मंता नही.
दारिद्य दोषो गुणराशि नाशी.
दारू, जुवा, रंडीबाजी, तेणें लोकीं इतराजी.
दारूचा कैफ करणें, बळें वेड घेणें. [ सतो.
दारूच्या कैफांत गुंगतो, तो पशूसारखा दि-
दारू चढती, अक्कल जाती.
दारू पाठीवर आहे, गाढव पाणी पिऊन राहे.
दारूबद्दल पाणी पिणें, न होय ऋण आणि दुखणें.
दारूच्या छंदीं लागतो, संसारांतून उठतो.
दारूबाज वाईटपणा, करितो जिवाची हेळणा
दारू पोटीं जिरती, शब्द ओंठीं तरती.
दारूनें बहु बुडाले, समुद्रानें थोडे ग्रासले.
द्वाड मशालजी थोडा उजेड पाडतो.
द्वाभ्यां तृतीयो न भवामि राजन्.
दावतो नये, दवडतो नये.
दावलयास देव धार्जिण.
द्राविडी प्राणायाम. [ राशी.
द्राक्षलता करा स्वर्गी, फळांच्या पडतील
द्राक्षे उंच मांडवावर, कोल्हा आंबट म्हणून फिरे.
दिठ गत माया, पगानगत मोह. [ जनानें.
दिधलें नसे जें परमेश्वरानें, तें काय द्यावें इतरा
दिन गया डेरे और मामल गया घेरे.
दिमाख भारी, खिसा दारी.
दियाही आंड आता है.
दिलपर दिल पैना है.
दिल लगा मेंडकीसे, पदमीन किया चीज है.
दिल्या भाकरीचा, सांगितल्या चाकरीचा.
दिवटी मागें बुधली आहेच.
दिवस गेला धामा, पुरे करा कामा.
दिवस गेला नागव्यानीं, न्हातांना पडदणी.
दिवस गेला रेटारेटी, चांदण्यानें कापूसवाटी.

दिवस बुडाला, मजूर उडाला.
दिवसभर राबली, फजीत पावली.
दिवस माखे नसती, चढते पडते असती.
दिवसा गंगाभागीरथी, रात्रौ सौभाग्यवती.
दिवसा घोडे, रात्रीं मढें.
दिवसा पहावें, रात्रीं ऐकावें.
दिवसाची रात्र, रात्रीचा दिवस. [ळवणी.
दिवसां दिवस टांचणी, बहू दिवसांची मि-
दिवसां दिवस पैसा,काळें करून होतो ढैसा.
दिवा लावी घरांत, मग देवळांत.
दिवाळखोरा देऊं नका,खराबींत येऊं नका.
दिवाळखोर नारायण त्याला बहुतांचें ऋण.
दिवाळी दसरा, हातपाय पसरा.
दिव्याखालीं अंधार.
दिव्याच्या पोटांत काळें.
दिव्यांत वात, तोंडांत हात.
दिसण्यांत गुळकट, कामाला पोंचट.
दिसे मढें, येई रडें.
दिसे साधेपणाचा तो गूढ मनाचा.
दिसे कुरूप कलेवर, आत्मा असतो सुंदर.
दिसतो मोठा, अकलेचा तोटा.
दिसून दृष्टी करी मंद, तो असे पूर्ण अंध.
दीड तोळा पाव रती.
दीड दमडीचा माल.
दीड बुटली, उरीं फुटली.
दीडशहाणा.
दीड हळकुंडांत पिवळी.
दीढ घोडा और बारमेखडा.
दीर्घ लिंगी दरिद्राणां.
द्या भर, करा तर. [काळ.
दुकान चांगलें संभाळ, तेणें होईल उदय-
दुकाळांत तेरावा महिना.
दुकाळांत मिष्टान्न.
दुकाळीं माळी, सुकाळीं साळी.
दुःख अग्नीपरी; झांकतां वाढे भारी.
दुःख दुःखानुबंधि.
दुःख धरून बसला, कर्ज न फिटे त्याचे बाला.
दुःख वेशीला बांधावें. [येतात.
दुखणें आणि वाईट हवा न बोलावतां
दुखणें आलें जागेवर, कांदा भाकर उरावर.
दुखणें आलें जागेवर, पथ्य गेलें शेरावर.
दुखणें कधीं नाहीं माहीत, तो मरतो पहिल्या दुखण्यांत. [कांहीं.
दुखणें येतां चैन नाहीं, समाधानीं नकळे
दुखणें हत्तीच्या पायीं येतें, मुंगीच्या पायीं जातें. [धान.
दुःख शोका वाद्य गान, चित्तास वाटे समा-
दुखणाइतास पहावें, चांगलें बोलावें.
दुखणें वाईट संसारीं, स्त्री होई म्हातारी.
दुखणें वाटे बरें, उपाय सहन न करवे.
दुखतें पोट, म्हणे कवाड लोट.
दुःखा अंतीं वैर. [दुःखावर.
दुःखाची सत्ता मनुष्यावर, मनुष्याची नाहीं
दुःखाची स्वारी येती, जिवा पुरे वाटे होती.
दुःखांत सुख.
दुःखावर डागण्या देणें.
दुःख पाहून डाग द्यावा.
दुगाणीचा मुळा, तीन पैसे हेल. [सुखी.
दुजा आपणाहून दुःखी, पाहून स्वतःस मान
दुजाची पत राख, तो ठेवील तुझी साख.
दुजाचें घेऊं पाहती, शेवटीं आपलेंही घालविती. [चें भावंड.
दुटप्पी भाषण अवघड, केवळ लबाडी-
दुधांत साखर.
दुधाची तृषा ताकानें पुरी होत नाहीं.
दुधातुपाच्या गुळण्या टाकणें.
दुधाचा घोट पिववेना, आणि ओकवेना.
दुधानें तोंड पोळलें तर ताक फुंकून पितो.
दुधाला गेली, तिकडे कांटे खायला राहिली.
दुधाला आणि तुपाला झांकण कोण न ठेवील.

दुधेली गाय दो लाते भी भली.
दुनया तो झुकती है, झुकानेवाला चहिए.
दुनयाभर जी अक्कल, ती नाहीं एकाजवळ.
दुनया भुकी मग्ती है, घीशक्कर क्यौं नही खाती.
दुनया है और खुशामद है.
दुपारची सावली.
दुबळा आणि खजेला.
दुबळी आई, कोरडी नई.
दुबळ्या माणसाला बढाई बहुत.
दु × × ची महिमा मोठी.
दुबळे देवाची दिपमाळ.
दुभती म्हैस देऊन मूढे गाढव कोण घेतो.
दुभऱ्या गाईच्या लाथा गोड.
दुमात्रा काना कौ. [ उत्पत्ती.
दुर्गुण आणि विपत्ती, आळसापासून
दुर्गुण घाय, सद्गुण औषधोपाय.
दुर्गुण्यावर, विघ्नें येती वारंवार.
दुर्गुणापासून वाईट काम.
दुर्गुणी लपून चाले, सद्गुणाचा डौल घाली.
दुर्गुणं सज्जनं कर्तुमुपायो नाहि भूतले.
दुर्जनं प्रथमं वंदे सज्जनं तदनंतरः. [माग.
दुर्जनास्तव देशत्याग, सज्जनांचें सांनिध्य
दुर्दशा जाती, दैवदशा येती. [ धारला.
दुर्दैवानें बाप फसला, तें पाहून मुलगा सु-
दुर्दशा उडून येती, जातांना चालत जाती.
दुर्मंत्री राज्यनाशाय. [ मुकती.
दुर्लभाची आशा धरतीं, आपल्या हिता
दुराचरण तेव्हांच जडतें.
दुराचरणी माने खर्च. [ खडे.
दुरून डोंगर साजरे, आंत असती कांटे
दुष्कर्म व्यभिचार, नामाडीचा प्रकार.
दुष्कर्माला आधीं भ्यावें.
दुष्कर्म परहस्तें, तें स्वतःच केलेंसें होतें.
दुष्ट कारभारी, समुदायाचा वीट करी.
दुष्ट मनुष्य कारभारि, लोकां उपद्रव भारी.
दुष्ट मेला, विटाळ गेला. [ गृहीं.
दुष्ट वांकडा सर्वां पाही, सरळ असे स्व-
दुष्ट वादांत पडणें तें घातक.
दुष्टपणानें वागे, हलकेपणानें मरे.
दुष्ट संगतीनें मन, दोषी न करिती सुजन.
दुष्टा गांठीं पैका झाला, उपद्रव करी लोकांला.
दुष्टाचरणी मनुष्याला अंतीं दुःख.
दुष्टाच्या कल्पनाही दुष्टच.
दुष्टाच्या दुष्टपणाला भिऊन वागावें.
दुष्टाचे नेत्र झांकी पाप, दंड उघडवी आपोआप.
दुष्टाचें बोलणें त्याच्या इच्छेप्रमाणें.
दुष्टाला सर्व दुष्टच दिसतात.
दुष्टालागीं मिळे धन, त्यागी आपले बंधुजन.
दुष्टाचे तोंडीं कुटका, देतां होय सुटका.
दुष्टास दूर ठेवावा, अपमान न करावा.
दुष्टास देणें, गुणाप्रमाणें. [आप माघारी.
दुष्टास येऊं न देतां घरीं, जाईल आपो-
दुर्दैवानें दुःख मोठें, निराशेनें अधिक वाटे.
दुर्व्यसनी असतो तो मनीं स्वस्थ नसतो.
दुसरीचा पाहुणा उपाशीं मेला.
दुसमान असावा, पण दाणा असावा.
दुसमान सोवे, न सोवे देवे.
दुसरा उपकार करी ते स्मर, आपले विसर.
दुसऱ्याकरितां याचना करितो तो स्वार्थ साधतो. [ पाहत नसतो.
दुसऱ्याचा न्याय करतो, आपला कोणी
दुसऱ्याचा वरवंटा घेऊन आपला काथ्या कुटणें. [ रींत राहणें.
दुसऱ्यास्तव खाडा खणणें, तर स्वतः दुशा-
दुसऱ्यास्तव खणी खाडे, तो आपणच त्यांत पडे. [ सुधारणें.
दुसऱ्याची खोड काढणें, पहिली आपली
दुसऱ्याची स्त्री विषवल्ली.
दुसऱ्याच्या डोळ्यांत भसकन बोट जातें.

दुसऱ्याच्या पतीस लावून धक्का, आपली पत स्थापूं नका.
दुसऱ्याचे ओंजळीनें पाणी पिणें.
दुसऱ्याचें कर्ज वारावें, तर त्याला पुसावें.
दुसऱ्याचें परमसुख, पाहून हेवा मानी दुःख.
दुसऱ्याचे बायकोला लुगडें नेसवून फळ काय.
दुसऱ्याचे वस्तुवर, कदापि लोभ न धर.
दुसऱ्याचे वेडेपणें आपण चातुर्य शिकणें.
दुसऱ्याचे व्यवहारंगीं, न करावी हुंगाहुंगी.
दुसऱ्याचें हरिशी, शासन पावशी.
दुसऱ्याशीं भांडण्यापेक्षां गुडघ्याशीं भांडावें.
दूध उघडें ठेवी, मांजराशीं बोल नाहीं.
दूधका जला, छांछ फुंक फुंक पीय.
दूधका दूध, पानीका पानी.
दूध गाईचें, फूल जाईचें.
दूधभात खाऊन दहींभात पदरीं बांधणें.
दूरस्था पर्वता रम्याः [ विपत्ती आणिती.
द्यूत, मद्य, प्रतारणा युवती, संपत्ती घालवून
देई, घेई, ती आई बाई, न देई ती मसणांत जाई. [ देवाला.
देई, पोशी, दुबळ्याला, तो ऋणी करतो
देईल तो दाता, न देईल तोही दाता.
देईल दाता तर खाईल मागता.
देईल वाणी तर खाईल प्राणी.
देऊळची गेली घांट, गुरवाचें गेलें चव्हाट.
देऊन फेडी लोकांचें कर्ज, राहील तें तुझें समज.
देऊळची सहाण, धर्मशाळेचें उखळ.
देख दुख्या करितो स्तुती, निंदेपेक्षां अधिक असती.
देखनेमे ढब्बू, चलनेमे शिवराई.
देखला गोहो, लागला लोहो.
देखला धोंडा, घातला कपाळीं.
देखलें तेथेंच टेंकलें.
देखले देवाला दंडवत.
देखलें नाहीं पंचानना, तोंवरी जंबुक करी गर्जना.
देखल्याचा लोभ सुटत नाहीं.
देखीय शिकार, और मारीय पैजार.
देखे मायकी नजर, दिकेन सोनेका निवाला.
देखो दुनी लिया जोग, घंटे काया बढे रोग.
देग बाई जोगवा म्हटल्यानें कोणी देत नाहीं.
देणें कुमळाचें आणि घेणें मुसळाचें.
देणावळ तशी धुणावळ.
देण्याघेण्यांत चूक पडतेच.
देणेदारापेक्षां घेणेदाराला जास्त स्मरण.
देणें, घेणें, राखणें, चतुराईनें करणें. [नाहींत.
देणें आणि दुखणें कोणालाही आवडत
देणें तसें घेणें, देव तसें धुपाटणें.
देण्याला नाहीं थार, आड आला शनिवार.
देणें नास्ति घेणें नास्ति, लोभ करावा हे विनंति.
दे दान सुटे गिरान.
दे माथ, धरणी ठाव.
देतां चोख, घेतां रोख.
देतां घेतां परमेश्वर.
देतांघेतां राखठोक, त्याला वरती सर्व लोक.
देतां दिवाळी, घेतां शिमगा. (अगर उलट)
देना थोडा, दिलासा बहुत.
देनेकू ना लेनेकू, लढनेकू मजबूद.
देव कोणाला चातुर्य देतो, कोणाला पैका देतो.
देवघर काढून शेतखाना बांधणें.
देव झाले लटके, ब्राह्मण झाले बटके.
देव तसें धुपाटणें, न्हावी तसें थापटणें.
देव न मारे लाठीसे, कुमत देत चढाय.
देवनामें भिक्षा मागतो, तो आपला अर्थ साधतो. [ ड्या मारी.
देव नाहीं देव्हारीं आणि धुपाटणें उ-
देवपूजेचा कंटाळा, हातीं सोंगट्यांचा चाळा.

देव होतां पाठमोरा, नमतीं विघ्नें येती घरा.
देवळीं रावळीं तिनदां. [असतां.
देवळाजवळ रहातो तो देवापासून दूर
देवाची करणी देवास ठाऊक. [दान.
देवाजवळ मागितला एक. देवानें दिले
देवाजवळ मागितला पूत, देवानें दिला भूत.
दे वाण घे वाण. [पुरेना.
देवानें दिलेलें सरेना, माणसानें दिलेलें
देवानें दिलें, कर्मानें नेलें, त्याचें फळ तुला आलें.
देवालयीं दुर्वासना, त्यास भोगी यमयातना.
देवाला वावें कण, द्यावें मण.
देवेगा सो पावेगा.
दैवो दुर्बल घातकः.
देशस्थ, गैरशिस्त.
देशस्थ दांडगा, भाकरीवर भांडगा.
द्वेषी आणि जुलमी न्यायाधीश, करती न्यायाचा सत्यनाश.
द्वेषी दुसऱ्यास मारूं पहातो, आपल्या हातीं आपण मरतो.
द्वेषानें कोणी श्रीमंत झाला नाहीं.
देह त्यागितां कीर्ति मागें उरावी. [वाटतें.
देह दुःख सहन होतें, मनाचें फार कठीण
देह ह्यातारा होतो, जीव तरणा असतो.
दैव-उदय झाल्यावीण, प्रगट होत नाहीं गुण.
दैव गती न सारखी, कदा न व्हावें दुःखी.
दैव देतें आणि कर्म नेतें.
दैव देतें तितकें नेतें.
दैव देतें, दैव घेतें, भाग्य कधीं स्थीर नसतें.
दैव नसतां अनुकूळ, होती आप्तही प्रति-कूळ. [कांठीं.
दैव नाहीं लल्लाटीं. पाऊस पडतो शताच्या
दैव पडतां माघारी. उड्या मारून काय करी.
दैव प्रधान.
दैव येईल तेव्हां दरवडा पडेल.
दैवहीन प्राण्यावर, संकटें येती वरचेवर.
दैव हें देवापेक्षांही एक मात्रेनें अधिक.
दैवाचा फटका नाहीं अद्यापि ठाउका.
दैवाची गती, विलक्षण अति.
दैवान्यथाभवतियल्लिखितंविधाता.
दैवीं आलें तें भोगलें पाहिजे.
दैवीं लिहिलें तें कदापि न टळे.
दैवी विचित्रा गतिः [करिती.
दैन्य ताठ विलग सोबती पण वास एकत्र
दैन्य मागण्याला सोपें, भोगण्याला कठीण.
दोघांचा धंदा सारखा, एक कमावी, दुसरा मारी हांका.
दोघांचें भांडण, तिसऱ्याचा लाभ.
दोघांचें वैरपण, मिटवितां कठीण.
दो टक्क्यांनीं धड.
दो दिवसाची चाकरी.
दो दिवसाची मजा. [मलमपट्टी.
दोन आण्यांची चट्टीपट्टी, बारा आण्यांची
दोन कांकणें जास्त. [लेउंगा.
दोन तोबे खाउंगा और एक मेंढी
दोन दिवस सासूचे, दोन दिवस सुनेचे.
दोन दिवसांचें चांदणें, दोन दिवसांचें नांदणें
दोन दिवे विकत घ्यावयास सोपें पण एक जळत ठेवणें कठीण.
दोन धक्के द्यायला घ्यायला बळकट.
दोन प्रहर आचार, नंतर अनाचार.
दोन पैच्या भाजीस तीन पैचा हेल.
दोन बोटें आभाळ उरलें आहे.
दोन वेळां काम केलें, सहज होतें चांगलें.
दोन वेळां एकणें, एक वेळां बोलणें.
दोन लढेंगे, इसमें एक पडेंगे.
दोन वेळां शहाणा ठकत नाहीं.
दोन हस्तक तिसरें मस्तक.
दोन हातीं मिळवावें, एक हातीं खर्चावें.
दोस्त नादान, दाणा दुसमान.
दोनो हातों पगडी संभालने पडी है.
दोस तिसरा जैसा आंखमें कंकर.

दोष दुसऱ्याचे पाहून, सुज्ञ घेती सुधारून.
दोन्हीं कुळें सारखीं, नामदेव पारखी.
दोन्हीं डोळे शेजारीं, भेट नाहीं संसारीं.
दोहों घरचा पाहुणा उपाशीं मरे.
दोहों डगरीवर हात ठेवणें.
दोहोंतर्फे जो विचार न करी तो एकाचें वाईट करी.
दोहों मांडवांतला कोडगा,(अगर बऱ्हाडी).
दोहों होडींवर पाय टेकूं नये.
दोहोंकडून मिळवूं पाहती,मिळतें तें दवडिती.
दोहों ससांचे लागतां पाठी,एकही नये हातीं.
दोंद वाढेल.
दोंदील घोडे, चालती थोडे.
दौड चले, गीर पडे.
दौलत जादा.
दंत भग्न होती, इच्छा नाहीं जात.
दंभवृक्ष निर्मूळ कर, वाढीव सत्याचा अंकूर.

## ध.

धड गाढव ना ब्रह्मचारी.
धडच कांस्यावर घालूं नये.
धड हिंदु ना मुसलमान. [बोकडांत-
धडांत ना भावडांत, आणि शेळींत ना
धन असल्या पाताळीं, तेज दिसे कपाळीं.
धन असल्या बहु भय, नसल्यानें तापत्रय.
धनकण पुरें धन, भांडीकुंडीं अर्धे धन आणि रोखे पुजे रावणाची ग्वाई.
धनका धय गया और दोस्तका दोस्त गया.
धनगर बसला जे वाया, ताकाबरोबर शेवाया.
धनगरभाई, दोन प्रहर दिवस येई तेव्हां खोडीचें वेड जाई.
धनगराचें कुत्रें.. ेंढ्याापाशीं ना मेंढ्यापाशीं.
धन देवापरी वाग र्वा, तरच भूतचेष्टा घ्यावी.
धनप्राप्तीस बहु यत्न, त्याहून कठीण तद्रक्षण
धनलोभ आणि? हेवा यांची तृप्ती न होय केव्हां.
धनलोभ दाविती,सज्जनांचीही दृष्टी फिरती.
धनलोभ सदा, त्याची तृप्ती न होय कदा.
धनवंताला विघ्नें फार गरीबाला थोडीं.
धन शहरांत आणि आरोग्य देशांत.
धनाढ्याची द्रव्यसंख्या त्याहून अधिक त्याची आख्या.
धनावांचून दुनया पंगु.
धनिकाचा संसार, निर्धनिकाचा ईश्वर.
धनिकाची सत्ता गरिबावर, रिणको धनकाचा चाकर.
धनिकाचे घरीं, गरजी घाली फेरी.
धनिकांचें लांछन, द्रव्याचें झांकण.
धनिकाहून, अधिक मान्य विद्वज्जन.
धनिनीस धक्का, कुंटणीस टक्का.
धनीक गरीब व्यवहारांत, परस्परें आश्रयांत.
धनीक द्रव्यानें चालती, गरीब आश्रयांत राहती.
धनी नाहीं पास, कुळवाड्याचा नास.
धनी नाहीं मेरे, आणि शेत भरलें बरें.
धनी झाला जागा, चोर आला रागा.
धनी फांकडा, नथीचा आंकडा.
धनी बसतो तेथें काम चांगलें होतें.
धनीनें सूझे ढाकणीसा, पडोसीनें सूझे आरसीसा. [काम करितो.
धन्याचा डोळा चाकराचे हातापेक्षां जास्त
धन्याची दृष्टी, घोड्याची पुष्टी.
धन्याचें नांव गण्या, चाकराचें नांव रुद्राप्पा.
धन्यानें कधीं पहावें, ऐकावें, कधीं अंध बधीर रहावें. [मलीदा.
धन्याला धत्तुरा ( अगर कण्या ), चोराला
धनुष्य बाणा विगर, मनुष्य धना विगर ( व्यर्थ ).
धनेन परिलभ्यंते जनेन बहु बांधव. [होत.
धरतां दुष्टाची संगत त्याचें कल्याण नाहीं
धर्म करितां कर्म उभें राहतें.
धर्म थोडा, कर्म अधिक.

धर्मस्य तत्वं निहितं गुहायाम्.
धर्मस्य त्वरिता गतिः.
धर्मशाळेचें उखळ, येत्या जात्यानें कांडावें.
धर्मांत दिलें नेसायला आणि परसांत गेली मोजायला.
धर्मादारीं कुत्रें.
धर्मादारीं, मारामारी.
धर्मा दिलें कर्मानें नेलें, कर्माचें फळ थोर [झालें.
धर्माचर सोमवार.
धर्माची गाय, कांटे खाय.
धर्माची डाळ म्हणे पाखडून घाल.
धर्माचें आणि ऊन ऊन.
धर्माचें वेणें, खोड न ठेवणें.
धर्मीं जय, पापीं क्षय.
धरायला डहाळी ना बसायला सावली.
धरितां गर्व आणि स्वार्थ,संसारीं होय अनर्थ.
धरिती जातीचा अभिमान, सर्व अज्ञान सज्ञान.
धरी चांगली रीत रव, बहुमान जनीं पाव.
धरीन तर डसेल, सोडीन तर पळेल.
धरूं नका तोरा, मागलें स्मरा.
धष्ट पुष्ट भवेत् दादा.
धाक कृपणा न कोणाचा, शत्रु आप- [आपणाचा.
धाक ना दरारा, फुटका नगारा.
धाक नाहीं शरिरीं, हर्वे तैसें करी.
धाकासारखी चीज नाहीं.
धाड पडावी पण चीत पडूं नये.
धात पडे, मनुष्य तडफडे.
धान्य तेथें खुशी, घर तेथें विवशी.
धान्याप्रमाणें उपकार, पेरण्यानें वाढती फार.
धाय धाय, करम लिखा सो पाय.
धारण, मरण, पाऊस कोणाचे हातीं नाहीं.
धारण शक्ति तेथें विस्मृति.
धारिष्टास दैव धार्जिण.
धारेवरचा वाघ.
धांव, धांव, जो वेध लिखासो पाव.
धांव धाव धांवले, फजीत पावले.
धांवण्यांत मारेकरी.
धांवा धांव बहुत, दैवीं असेल तें प्राप्त.
धांवणार पडतो, पोंहणार बुडतो, आणि शहाणा चकतो.
धिटाई खाई मिठाई, गरीब खाई गचांड्या.
धिमा शत्रू अकल्पित सखा, हें जाणून जरा हुशारी राखा.
धीटपणें वागतो तो जगीं प्रसिद्ध होतो.
धीर धरील, तो खीर खाईल.
धीरज धरम मितर और नार, आपतकाल [परखते चार.
धीर सो गंभीर, उतावळा सो बावरा.
धीरे धीरे दैव उघडे, जशी बाजारी किंमत [पडे.
ध्यानीं मनीं पानगा.
ध्यानीं वसे तें स्वप्नीं दिसे.
धुळीचे दिवे पाहणें.
धूलकी नहीं बांधी जाती.
धूळ फुंकून डोळ्यांत उडवून घेणें.
धैर्य आणि योग्पण हीं नाहींत भिन्न.
धैर्य, पैका, काळ अनुकूळ, सर्व घडून येतें तात्काळ.
धैर्य धरून श्रम घेती ते पर्वतादीक उलटती.
धैर्यावांचून अडचण म्हणजे भारावांचून जहाज.
धैर्यावांचून प्राप्तीची इच्छा खोटी.
धोब्याच्या लग्नाला उणें काय पायघड्याला.
धोंडभट्टी करणें.
धोंडा आणि पिकाचा लोंढा.

## न.

नऊ कोट नारायण.
नऊ खंड पृथ्वी, दहावें खंड काशी.
नऊ, चोवीस, एकादशी, कशाला पाहिजे गांवचा जोशी.
नऊ नडियादी, सात पेटलादी आणि एक [उमरेठी (बरोबर.)
नऊ नायक, दहावा पायक.
नऊ म्हण नऊ, किती खोलींत कितीं [गचांड्या देऊं.

नऊ, संध्येची पळी.
नकटा तो नकटा, पण धी तों चट्टा.
नकटीचे नथाला सत्राशें विघ्नें. [ नाहीं.
नकट्याला लाज नाहीं, वकट्याला भाज
नकटें असावें, पण धाकटें असूं नये.
नकटेकी नाक कटे, सवागज और बढे.
नकटें रुसलें, पायरीं जाऊन बसलें.
न करितां कांहीं, वाईट शिकूं पाही.
न कर्त्याचा वार शनवार.
न कळे काय अरिष्टें येती भोगा, हांसूं नये दुसऱ्याचे दैवयोगा.
नका करूं कसरत, तुह्मी जाल घसरत.
नको क्षमा कृतघ्नाची,करील हानि सत्वाची.
नको नको, आणि पायलीचें चाखो.
नखभर सुख, हातभर दुःख.
न खात्या देवाला बोनें ( नैवेद्य. )
नगाऱ्याची घाई,तेथें टिमकीची काय बढाई
नगाऱ्यापुढें तुणतुणें. [ त्याचें
न घे ऐकून कोणाचें, कान फार बधीर
नच धर्मो दयापरः
न चोरहार्य ( विद्याधन. ) [ समजावा.
न जाणे समय कैसा लोटावा, तो पूर्ण दुःखी
न जावें सुंदरपणावर, आधीं गुण श्रवण कर.
न जपे ऐसें ओझें, दुसऱ्यावर न घालावें.
नणंद आणि कळीचा आनंद.
नणंद खेळी, रहाटाची फळी.
नदीचा शोध करितो, त्यास समुद्र भेटतो.
न देवाय न धर्माय अश्वत्थाय नमो नमः
न नीचो यवनात्परः. [ पितरा.
न पडती चित्रा, तर भात न मिळे
न पढा न सिखा, नाम विद्यासागर.
न पश्यति च जन्मांधः कामांधो नैव पश्यति.
न पुत्रो न पुत्री.
नफा दिखता है, मुद्दल घुसता है.
नपुंसकाला पद्मीण.
न बासी रहे न कुत्ता खावे.
न बोलतां काम करणें तें चांगलें होणें.
न बोलावतां भोजना आला, कोठें बसावें हें न सुचे त्याला.
न बोलून शहाणा.
न भूतो न भविष्यति. [ राहती.
नम्रता आणि संपत्ति, एके ठायीं क्वचित
नम्रतेची काया, हाच सद्गुणाचा पाया.
न मागतां कृपा करतो, त्याचा उपकार मोठा होतो.
न मागे तयाची रमा होय दासी.
न मातुः पर दैवतं. [ म्हणावी.
न मारतां भय दावी, ती बरवी नीति
न रहे आप, तो शूं करे माने बाप. [जाय.
नर करणी करे तो नरका नारायण हो
नर करे सो होयगा.
नर्क आहे तेथें स्वर्ग नाहीं.
नृपति जनपदानां दुर्लभः कार्यकर्ता.
नरा शब्दांत गोवावें, पशूंस शिंगीं धरावें.
नरा हर हुन्नरा. [ आळसानें मर.
नरा हर हुन्नर कर आणि पोट भर नाहींतर
नर्मदेंत जितके कंकर तितके शंकर.
नर्मदेचा गोटा.
नरो वा कुंजरो वा.
नलगे नलगे बळेंच विलगे.
न लागती मघा तर ढगाकडे बघा. [पुच्छं.
नालिका गतमपि,कुटिलं न भवति सरलं शुनः
नवईपेक्षां अवई कठिण.
नवरा नवरी एक, वऱ्हाडी गांवचे लोक.
नवराबायकोचें भांडण, राळ्याचें कांडण.
नवरा मरो, नवरी मरो, उपाध्यास दक्षणेशीं कारण. [ वरणास.
नवरा रडतो तरणास, वऱ्हाडी रडतात
नवऱ्याचें पीठ, बायकोचें मीठ.
नवऱ्याचें मारणें, चिखलांत पडणें.
नवल झालें, गाढव मेलें.
नवल विपरीत, कांदा झिपरींत.

नवस केले परोपरी पण एक देव नाहीं घरीं. [ लागे पती.
नवसें कन्या पुत्र होती, तर कां करणें
नवा जोगी मांडभर जटा.
नवी नवरी, बोऱ्याचें अंथरूण.
नव्या नव्या बायकांच्या नव्या परी, पहिली होती ती असें न करी.
नव्याचे नऊ दिवस, मेल्याचे तीन दिवस.
नवें तेव्हां सर्वे, शिक्याला ठेवे.
नवें नवें, जेवी सवें.
नवें नऊ दिवस, खळणें तीन दिवस.
नवे नवे डोळे, नवे नवे तमाशे.
नशीब लागलें यायला,पदर नाहीं घ्यायला.
नसन खवडा, शेजार दवडा.
नसीब की जाल, और सैतानका खेल, मगरेव कीं जालमे पकड गये शेर.
न्हाव्याचें न्हावण्य, ब्राह्मणाचें ब्राह्मण्य.
न्हाव्याच्या उकरड्यावर केंसांचा भार.
नंगे खुदासे बेजार.
नाक असलें तर नथ ल्यावी.
नाक कापलें तर म्हणें भोंक आहे.
नाक कापावें व पाटवानें पुसावें.
नाक खाजविलें आणि नकटें वरमलें.
नाक मुठींत, हरभरे ओटींत. [मान.
नाकचें मोतीं ठेवून गहाण, राखी जांवयाची
नाकझरीच्या पाण्यानें तोंड धुऊन ये.
नाक धरलें कीं तोंड उघडतें.
नाक नकटें आणि डोईला तिकटें.
नाक मोठें, दर्शन खोटें. [ घरीं.
नाकांत वेसण दुहेरी, तरी पाय राहीना
नाकापर्यंत पदर, पण वेशीपर्यंत नजर.
नाकापेक्षां मोतीं जड.
नाकाला धाका आणि कपाळाला थुंका.
नाकीं नाहीं कांटा, पण कोरडाच ताठा.
नाकीं नव ( नळ ) आले.
नागवलासरे बाबा,नागवल्या आया बाया.
नागवी सुवासिन भेटली.
नागास दूध पाजलें,शेवटीं प्राणास मुकलें.
नागी जोईने संन्याशी जागे.
नागवें नाचणार तर रंगण तरी धर.
नाचतां येईना आंगण वांकडें, रांधतां येईना ओलीं लांकडें.
नाचन जाने आंगन तेढा. [ नये.
नाचाऱ्याचें खावें पण उच्चाऱ्याचें खाऊं
नाजुक नार तिला चाबकाचा मार.
नात्यांत नातें आणि कडकडा खातें.[ळीक
नात्याची जवळीक तशी आदराची कोंव-
नादान दोस्तसे दाना दुशमन भला.
नादान बात करे, दाना कियास करे.
नादान की दोस्ती जीका जान. [हटांत.
ना धडांत ना भाकडांत,ना बऱ्यांत ना वा-
नानृतात्पातकं परम्.
नामदार तो नम्र फार. [ प्राण.
नाम असे उदार कर्ण, कवडी देतां जाई
नाम उंदरी, सांगे सुंदरी.
नाम बडा, दरसन थोडा.
नाम्या निराळा, धोकटी विठूचे गळां.
नामे शाहा कमा खावे,नामे चोर मारा जावे.
नाय, निर्गुड, माका, सर्व औषधांचा काका.
नाय निर्गुड माका, तीनोको मारे फाका तो उड जाय लंका.
नारीचें बोलणें, गवताचें शेकणें.
नाऱ्या जाणे बारा, तर केशा जाणें साडे तेरा.
नाऱ्या नागवला, तुक्या उजवला.
नांव अन्नपूर्णा, टोपल्यांत भाकर उरेना.
नांव गंगाबाई, रांजणांत पाणी नाहीं. [ होळी.
नावडतीची आली पाळी, गांवाची झाली
नावडतीचें मीठ आळणी, आवडतीचा शेंबूड गोड. [ हातीं.
नांव महीपती, तिळभर जागा नाहीं
नांव मोठें, लक्षण खोटें

नांव सांगावें पण गांव सांगूं नये.
नांव सोनूबाई, पायीं कथलाचा वाळा.
ना विष्णुः पृथ्वीपतिः.
नाशिकर, काशीकर, गांठ पडली वेळेवर.
नाशिक गेलें त्रिंबकास, नाशिक परगणा ओसाड.
नाशिकची जिल्हई, पैठणचा आदर.
नाशिक नव टेंकावर वसविलें.
नासलें फळ दुसऱ्या फळा, नासून हरी त्याची कळा.
नासलें मिरीं जोंधळ्याला हार जात नाहीं.
नासल्या गीताचा तनाना.
नास्ति धान्यसमं प्रियं. [ सगळें.
नाहीं काळ अनुकूळ, ऐसें म्हणत असतीं
नाहीं उचलण्याची शक्ति, त्यावर भार घालिती.
नाहीं नाहीं म्हणती, खाली जागा झाडिती.
न्याय नाहीं गांवाला, चोर दंडी सावाला.
नांदते घरची केरसुणी.
निजलेल्यास कोणी जागा करील, जाग्याला जागा कोण करणार ?
निजेवांचून पूजा नाहीं.
निठव्यांत घालून आठवें झांकण ठेवावें.
निढळाच्या घामाची मजुरी. [ बांधली चिंधी.
निनांदतीला हजार बुद्धी, फोडलें कपाळ
नित्य मरे, त्याला कोण रडे ? [ उपाय.
नित्य उद्योगानें मोह जाय, गेल्या सिद्ध
निपट नागवी, तिचे बोच्या आड काडी.
निम हकीम, और कतरे जान.
निमकहराम. [ गलेमे.
निजाम गये पढने कू, और मशीद आये
निरपण खाई तें मोठें होई, मळ्यांत जाई तें केळें खाई.
निरस्त पादपे देशे एरंडोऽपि द्रुमायते.
निर्धन पुरुष मशकासमान.
निर्धनको धन राम.
निर्धनी खलवाटी क्वचित.
निर्बळाचें बळ राजा.
निराळा ओयरा, कोण कोणाचा सोयरा.
निरुद्योगाचें फळ दारिद्र्य. [ पासून होती.
निरंतर ज्ञानाची उत्पत्ति, अनुभव स्मृती-
निश्चयाचें बळ, तुका म्हणे तेंची फळ.
निषिद्ध वस्तूवर आवड फार.
निष्ठा तसें फळ.
निष्ठुरता जुलम्यापरी, करितां भीति धरी.
निष्ठुरतेपासून, सूड होय निर्माण. [प्रतिमा.
निष्ठुरतम नाहीं क्षमा, केवळ दुष्टाची
निमत बाजारीं, पडला शेजारी. [ अनेक.
निस्पृह बोध क्वचित एक, स्वार्थ बुद्धी असती
निस्पृहस्य तृणजगत्.[झाला आणखी घाला.
निसलाचे गाडींत घातला पाला, म्हणे थंड
निंदकाचें घर असावें शेजारीं.
निंबाला आल्या निंबोळ्या, कावळ्यांला आल्या गळचंड्या.
नीच रतली रायाशीं, तिला कोण म्हणे दासी?
नीच होय ते कधी उंच न थाय.
नीचाची प्रीत, वाळूची भिंत. [ साऱ्या.
नीट बोल नाऱ्या तर बोडक्या झाल्या
नूर तसा वकर.
नेम निष्ठा, पोकळ कांसोटा. [ होतो.
नेमानें काम करितो,त्याला क्वचित् पश्चात्ताप
नेसतां येईना म्हणे लुगडें आंखुड.
नेसेन तर शहाचें नेसेन, नाहीं तर नागवीच बसेन.
नोकरी नित्य नवी.

## प.

पचेल तें खावें रुचेल तें बोलावें आणि शोभेल तें ल्यावें.
पडतील चित्रा तर भात न खाय कुत्रा.
पडतील स्वाती तर पिकेल माणिक मोतीं.
पडद्यांतली बाहुली पडद्यांतच शोभते.
पडला तर आंबा, नाहींतर ओलट.

पडल्या फळाची आज्ञा.
पडेल हस्त, तर पिकेल मस्त.
पढत मूर्ख. [ कुदरका खेल.
पढे पारशी बेचे तेल, एतां अजेब
पतिव्रता आणि मुसळदेवता.
पतिव्रता चांगुणा, शंभराला एक उणा.
पत्रावळी काढ, म्हणे जेवले किती ?
पदरचें द्यावें पण जामीन न व्हावें.
पदरचें खावें व चौघांत जावें.
पदरचें खावें पण नदरचें खाऊं नये.
पदरीं पडलें पवित्र झालें.
पदरीं पडलें झोड, हांसून केलें गोड.
पर की आस सदां निरास.
पर थोडा, घुस्सा बडा.
परदुःखेन दुःखिता विरळा.
परभारा, पावणे तेरा.
परस्परं समर्पयामि.
परस्वाधीन जिणें, पुस्तकीं विद्या.
परस्त्री पराची माता.
परस्त्री मातेसमान.
पराचा कावळा.
पराय घरपर लछमी नारायण.
परोपकाराय पुण्याय, पापाय परपीडनं.
परोपदेशे पांडित्यं.
पथ्येसति गदार्तस्य किमौषध निषेवणं.
परदुःख शीतळ असतें.
परधर्मो भयावहः.
परनिंदा श्रवण न कर, हात ठेवी कानावर.
परवर दिगार, घऊनी रोटली नी घी लगाड.
परवशतो नरकः [ और जूतीका मार.
परस्त्री यार, सदां खुवार, कांटोका बिछाना,
परान्नं प्राणसंकटं.
परान्नं विषभोजनं.
पराधीन, स्वप्नीं सुख नाहीं.
परिपाठानें सर्व सोपें.
परिश्रमाचे बळें, कलाकौशल्य केलें.
परिक्षा सोन्याची कसोटीनें, माणसाची द्रव्यानें.
परीस स्पर्शें सुवर्ण तैसें मना समाधान.
परोपकाराय सतां विभूतयः.
पर्वने गांड होळी, माणसने गांड कोळी.
पलखमें दर्याव.
पशूका होत पनैया, नरका कछु नही होत, जो नर करणी करे तो नरका नारायण होत. रोटी )
पहिली बेटी, मालाची पेटी ( अगर तूप
पहिल्यानें जेवावें, मागाहून नहावें.
पहिले पाढे पढे पंचावन, बरोबर पंचावन.
पळणारास एक वाट, शोधणारास दहा वाटा.
पळतां भुई थोडी.
पळस कोंकणांत गेला तरी पानें तीनच.
पळी असतां हात कां भाजून घ्यावा ?
पक्ष्यांत काऊ, माणसांत न्हाऊ.
पक्ष्यांत कावळा, जनावरांत कोल्हा.
पक्षी अंतरानें उडतात, मेंढ्या जथ्यानें चालतात.
पक्वान्नाचा घांस, त्याला विघ्नांची रास.
पंक्तीस चुकला तो भोजनास चुकला.
पंक्तीस प्रपंच करूं नये.
पंक्तीस भोजन, सदरेस निद्रा.
पंख्यानें धुकें फांकत नाहीं.
पंचपक्वान्नीं जेवण, मुताचें आंचवण.
पंचाभिः सहगंतव्यम्.
पादगीला पावल्याचें मीप. [ नें तार तोडूं नये.
पादशाला बादशाही आली ह्मणून पिंजाऱ्या-
पादा पण नांदा.
पानावर भात, जानव्यांत हात.
पानीमे पथर नही सडतां. [ केविलवाणी.
पाप करितां न भी मनीं, मग दिसे
पापाचा घडा भरला ह्मणजे आपाप फुटतो.
पापाची पायली, भरली कीं लवंडली.
पापासारखें प्रायश्चित्त.

पापास नाहीं पार, त्यास नरकाची धार.
पापाचा बाप पैका.
पाप्याचें धन प्रायश्चित्त.
पाप्याला पंढरपूर, नकट्याला तुळजापूर.
पाय असल्यास पायतणाला काय तोटा ?
पाय घसरूं दे पण जीभ घसरूं देऊं नको.
पाय धू ह्मणे सांखळ्या कवढ्याच्या ?
पायपोसाची जोड, हंशानें केली गोड.
पायरीच्या पायां पडून मग वर पाय द्यावा.
पायलीचे पंधरा, अधोलीचे सोळा.
पायाखालीं जळतें आणि डोंगराखालीं
विझवायास जातो.
पायांत पाय, त्याचा जन्म व्यर्थ जाय.
पाऊस पडे, मोती गिळे. [ मडकें दणदणी.
पाऊस पाणी, आबादाणी, दाण्याचें
पांचामुखीं परमेश्वर.
पांचावर धारण बसली.
पांचीं गुण तो पन्नाशीं गुण.
पांचीं बोटें सारखीं नसतात. [ तो पाजीच.
पाजीचा झाला गाजी तरी अखेरीस पाजी
पाटकरूं तें बटकरूं.
पाट नाहीं बसायला, रांगोळी कशाला ?
पाटायास रकट्याचें ठिगळ. [ दिला.
पाटिलबुवा भला, तर प्यादा लावून
पाठजाळ पुरवेल पण पोटजाळ पुरवत नाहीं.
पाठ फोडून भावंड नव्हे आणि पोट फो-
डून मूल नव्हे.
पाठीचें धिरडें.
पाठीना पोटीं, दारीं लागली कांटी.
पाठीवर मारावें पण पोटावर मारूं नये.
पाठीस पोट लागलें आहे. [ निश्चय.
पांढरा कागद, तरुण वय, डाग लागे
पाणचट गुणाची, ह्मणे मी पुण्याची. [ वैसा.
पाणी तेरा रंग कैसा, जिसमें मिलुंगा
पाण्या आधीं वळण बांधावें. [राहत नाहीं.
पाण्यांत हगलें तरी उमगल्यावांचून
पाण्यांत म्हैस, बाहेर मोल.
पातक आगमीं गोड, निगमीं कडू.
पातिव्रत धर्म जिचा, पति ठेवी मान तिचा.
पात्र पाहून दान.
पात्रांत असला तर डावेंत येईल.
पाद गेला, बोचा आंवळला.
पादऱ्याचें गांडीचा आणि ल्हाचराच्या
तोंडाचा विश्वास नाहीं.
पायीची वहाण पायीं बरी.
पिकेल डोण तर खाईल कोण ?
पिछेसे आई, आगे गई.
पिठांत मीठ.
पिंपळाचें फूल. [ जळालें.
पिंपळाचें पान गळालें कीं पिंपळगांव
पितरांच्या शिंदळक्या काढणें.
पिवंवना तें पिवंवेना पण लवंडूनही देववेना
पिशाच्चाचें हातीं कोलीत.
पिसाचा कावळा.
पिसाला उपास, ढेंकणाला रविवार. [ नाहीं.
पीठ आहे तों मीठ नाहीं, मीठ आहे तों पीठ
पी हळद आणि हो गोरी.
पुखानंद आणि सुखानंद.
पुंजी भडबुंजाची आणि मिजास शहाजा-
द्याची. [ बैल ह्मणा.
पुढ्याला शेण चोपडून मला कोठीचा
पुढें पाठ, मागें सपाट.
पुढल्यास ठेंच, मागचा शहाणा.
पुढें घट्ट, मागें पोंचट.
पुढें तिखट, मागें आंबट.
पुढील जोत तसें मागील जोत.
पुण्य करितां होय पाप, दूध पाजून पो-
सला साप. [ झेंडा.
पुत्र व्हावा ऐसा गुंडा ज्याचा तिहीं लोकीं
पुराणांतलीं वांगीं पुराणांत.
पुराणमित्येव न साधु सर्वं.
पुरुषांचा डोळा, स्त्रियांचा चाळा.

पुरुषाला परमा, लांकडाला गरमा.
पुर्वांग पुरवतें, उत्तरांग पुरवत नाहीं.
पेरलेलें उगवतें.
पैजेचा विडा उचलणें.
पैशाची भवानी, नवटांक तेल.
पैशानें पैसा जोडतो.
पैसा गांठ, और जोरू सांथ. [ बापा.
पैसा टाकुनियां संतापा, विकत घेऊं नका
पैसा दक्षणा, लक्ष प्रदक्षणा. [ बडी हजामत.
पैसा बडी खुशामत, पैसा बडी सलामत, पैसा
पोकळ सांपडलें म्हणून कोपरानें खणूं नये.
पोट अंत, सांगे संत.
पोटचें द्यावें पण पाठचें देऊं नये.
पोट भरतें पण डोळा भरत नाहीं.
पोट भरेना तर काव्या भराव्या.
पोट मोठें, बसूं कोठें.
पोट लागलें पाठीशीं, हिंडवीतं देशोदेशीं.
पोटाच्या पाठीस लागणें.
पोटानें पुरें म्हणविलें आहे.
पोटाला द्यावें, काम घ्यावें.
पोटासाठीं केलें ढोंग, तेथें कैचा पांडुरंग.
पोटांत एक नी ओंठांत एक.
पोटांत भूक माईना तोंडांत घास जाईना.
पोटीं जळें, माध्यान्ह कळे.
पोरचेष्टा कीं माकडचेष्टा. [ दुःख ?
पोराचा कापला खवडा तर म्हाव्याला काय
पोराचें चिन्ह डोहळ्यावरून ओळखावें.
पोर हंडी सोस, सासू रोष, न होय संतोष.
पोहऱ्याला चऱ्हाट बोळवण.
पोरा, बुद्धी बारा.
पोराहून पोरगळ, म्हाताऱ्याहून वारगळ.
प्रत्यक्षाला प्रमाण नको.
प्रथम ग्रासे मक्षिका पातः.
प्रपंच साधून परमार्थाचा लाभ ज्याणें
केला, तो नर भला भला.
प्रयत्नांतीं परमेश्वर.
प्रयत्नावांचून प्रारब्ध लंगडें.
प्रसंगावांचून परीक्षा होत नाहीं.
प्राप्ते षोडशवर्षेतु गर्दभीत्यप्सरा भवेत्.
प्रारब्धहीनाला सुवर्णाची माती दिसते.
प्रेत झांकून ठेवावें पण आधीं पेरणीस जावें.

## फ.

फकीर निचिंत कीं ज्या मुता त्या मसीत.
फजितीच्या पायीं घुंगरू.
फजितीच्या जिण्यापेक्षां मरणें बरवें.
फट् म्हणतां ब्रम्हहत्या.
फर्रर फूं, न घर जाईने शाशे शूं.
फराळ केला म्हणजे जेवणाचें मात्रें आणि
अंगवस्त्र ठेवलें म्हणजे बायकोचें मात्रें.
फरे कपाळ, तों शूं करे भूपाळ.
फळाच्या झाडाला सर्वजण धोंड मारतात.
फाटकें नसावें, पण स्वतंत्र असावें.
फाटकें लुगडें तुटक्या बाह्या चला अबा-
जी मुनमुख पहाया.
फाटक्याला ठिगळ, मोडक्याला कवळ.
फाटक्याला शिवावें किती, आणि दुब-
ळ्याला द्यावें किती ? [ गुणाचें.
फाटलें पांघरूण वाणाचें आणि मेलें माणूस
फाटक्या परीस नटकें बरें.
फार झालें आणि हसूं आलें. [ न्याय.
फांसा पडेल तो डाव, राजा बोलेल तो
फिरत्या भोंवऱ्याचे वेढ मोजतां येत नाहींत.
फुकट आणि चोखट.
फुकटचा गाल, केला लाल.
फुकट आणि तीन दम.
फुकट दर्शन, देवळांत दाटी.
फुकट पिडा, बघायला चला.
फुकट बिसनी, तंबाखू उसनी.
फुकाचें गांव जेवण होत नाहीं
फुटका डोळा काजळानें साजरा.
फुटलें जातें, तुटलें नातें. [ विधाता.
फुटलें मोतीं, तुटलें मन सांधूं न शके

फुसकी शंका, फुसकें समाधान.
फुसकाईचा अंगारा.

## ब.

बकरीने दूध दीया पर मेंगनीयो भरा.
बखत पडे पर जानये को बैरी को मीत.
बखत पडे बांका तो गद्धेका कहना काका.
बगलमे कोंबडा, और गांव मे ढंडोरा.
बगला मारे पंख हाथ.
बगला भगत भया.
बछडा खुंटेके बळ नाचता है.
बटीक बाईल, कटक दादला. [सर्व काम.
बडबड करितां नाहीं जोम, पैका करी
बडा घर और पोकळ वांसा.
बडे बापका बडा बेटा.
बडे बडे बह गये, गद्धा कहे कितना पानी.
बडे भाई सो बडे भाई, छोटे भाई सो
सुभानअल्ला. [करणें.
बडे लोकांचें मागणें, गरिबांस संकुचित
बढाईखोर आणि लबाड उभयतां असती
भाऊबंद. [जाती.
बत्तिस दांत कीं भाका खालीं नाही
बनिया देता नही पुरा तोल.
बानिया मारे जानको, ठक मारे अजानको.
बानिया भी आपना गुढ छुपाकर खाता है.
बरी बोल वांचे तुझें काय वेंचे.
बरें वाईट जें भाग्य, पत्नी जाणा हेंच योग्य.
ब्रह्माचा लिखा, सटवीचा टांका, त्यास
कोण देईल झोंका ?
ब्रह्माच्या गांठी, मग कां कपाळाला आंठी?
ब्रह्मानें लिहिलें जें भाळीं, तें न चुके कदा
काळीं.
बलबल पुरी, टमटम राजा.
बलवाना पुढें, खरा मार्जी पडे.
बसणार असेल खरमरीत तर तेजी
चाले झरझरीत.
बसूं जाणे त्यास ऊठ कोण म्हणे ?
बसे तो फसे, फिरे तो चरे.
बहते नदीमे हाथ धो के ले.
बहिणीमुळें भावोजी सोयरा.
बहिरें एके तेरें, आचरट मागें सांवारें.
बहीण भावया, सासू जांवया.
बहुमत घेतो तो वेडा नसतो.
बहु मोली अल्प संतोषी.
बहु रत्नाः वसुंधरा.
बहु वचनांचा पाल्हाळ, भंग होतो तात्काळ.
बहुतकरून सांधणें थोड्यासाठीं फसणें.
बहुत देखिले टापेटिळे, पण चिखलाला
नाहीं पाहिलें डोळे. [पुरता.
बहुत मजवान्या करितां, पैका न राहे
बहुतांचें जमलें मत, तेथें थोड्यांचें नाहीं
चालत.
बहू कामें एका हातीं, सिद्धीस न जाती.
बहू चाकर कामावर बातमी देती घरोघर.
बहू धन ज्याचे हातीं ते बहुधा मूर्ख होती.
बहूनां चैव सत्वानां समवायो रिपुं जयेत.
बहू पांडित्य बोलती, ते मूर्खपणें वागती.
बहू बडबड करी, तो थोडें आचरी.
बहू मूर्ख मिळती, बहू तमाशे होती. [झाला.
बहू वर्षे वाचला, अखेर मृत्यूचे स्वाधीन
बाई आली पणांत आणि बाबा गेला
कोनांत.
बाईल पैशाची.
बाजारचा मेवा, बाप लेंकांनीं खावा. [ल्या.
बाजारच्या आधीं उचल्यांनीं कंबरा बांध-
बाजारांत तुरी आणि भट भटणीला मारी;
रांडे घट्ट करशील का पातळ करशील?
बात की बात, कुरापत की कुरापत. [सकळ.
बा तुझा चालता काळ खायाला मिळती
बाप तसें मूल, झाड तसें फूल.
बाप दाखीव नाहीं तर श्राद्ध कर. [यचा?
बाप पाहूणा आला म्हणून रेडा का दोहा-

बाप मरेंगे जद बैल बाटेंगे.
बापसे बेटा सवाई.
बापानें केलें नांव, मुलानें वाहविलें गांव.
बापापरीं बाप गेला, बोंबलतां हातही गेला.
बापाला बाप ह्मणत नाहीं तो चुलत्याला काय काका ह्मणणार ?
बाबा जाणें, संक्रांत जाणें.
बाबा ब्राह्मण, आई सुवासीन.
बाबावाक्यं प्रमाणं.
बाबूके भाई दरवेशी.
बाबू जेवले, पतर पालणं.
बाब्या गेला, दशम्याही गेल्या. [ पोंचट.
बाभळीचा कांटा पुढें तिखट आणि मागें
बायकोचा बोल आणि चाब्याचा अंक कळत नाहीं.
बायको दुसरी, फजिती तिसरी.
बायकांची अक्कल चुलीपुढें.
बायकांच्या तोंडांत गोष्ट राहत नाहीं.
बायको भली तर नवरा भला.
बायको मरेना, आशा सुटेना.
बायकांचें गाणें, नागवें नहाणें.[गांड फाटे.
बायको करितां सुख वाटे, पण धवला घेतां
बायको केली ह्मणजे आणा पाठीस लागतो. [ ळाले तेही तसे.
बायको वेडी, पोरगें पिसें, जांवई मि-
बारा पिंपळांवरचा मुंजा.
बारा बंदरचें पाणी प्याला. [ जव्हारी.
बारा बंदरकरी, पांच पुणेरी आणि एक
बारा भाईकी खेती.
बारा मांडवांतला वऱ्हाडी.
बारावा बृहस्पती.
बालंकास माता, दुर्बळास त्राता.
बालं छदानु वर्तनात्.
बालादपि सुभाषितं ग्राह्यं.
बालान रूदनं बलं.
बालेघाट, सोन्याचा कांठ.

बाल्यस्तावत् क्रीडासक्तः
बावळी मुद्रा, देवळीं निद्रा.
बाष्कळ बोलणें, पुष्कळ खर्च.
बाष्कळ बोलणें, पुष्कळ खाणें.
बाहेर जटा वाढवाव्या,आंत संसार करावा!
बाहेर झकपक पण आंत भगभग.
बाहेर बरवा, आंत हिरवा.
बाहेर सांगे ब्रह्मज्ञान, आंत करी मद्यपान.
बाळंतिणीच्या वेदना वांझेस काय माहीत ?
बिगारीचें घोडें, तरवडाचा फोंक.
बिदीचें गाढव बिदीलाच चरणार.
बिचमे मेरे चांदभाई.
बुडत्याचा पाया खोल.
बुडांत नाहीं तर वर कोठून येणार ?
बुढ्ढा पेका व्याह पडोसियाके वास्ते.
बुढ्ढे घोडीकू लाल लगाम.
बुंदसे गई सो हौदसे आंत नही.
बुद्धिः कर्मानुसारिणी.
बुद्धीला वैर करूं नये. [ कशाला पुसा.
बुध भेसा, नवें नेमा, शनवार आइतवार
बुराजीना खवसे होना.
बुधे बेटी, ने फरी नही भेटी.
बेटी बापाची, जमीन बादशहाची.
बेदिल नोकर, दुष्मन बराबर.
बेबंद नगरी; झोटिंग बादशाही. [ राहिला.
बेल गेला, भंडार गेला, कोटिंबा हातीं
बेवकुबाचा माल अक्कलवंताचा खुराक.
बेअमकी बला दूर, मारो पैजारा ताजा नूर.
बैठेसे बिगार भली.
बैल गाभणा तर ह्मणे नववा महिना.
बैल गेला झोपा केला.
बैल खाके रसी लीये.
बैलानें रडावें तो गोणीच रडते.
बोकड माते, दाढीवर मुते.
बोके संन्याशी.
बोट वांकडें केल्याशिवाय तूप निघत नाहीं.

बोट सुजलें ह्मणून डोंगराएवढें होत नाहीं
बोटानें पोरें होतीं, तर बायका नवरा कशाला करत्या ?
बोडकी आली, केंसकर झाली.
बोडकी आरशांत आहे, तुका ह्मणे तेथें कांहीं आहे. [ ला?
बोडकीला कुंकूं, वांझेला कातबोळ कशा-
बोडकें न्हालें पाणी वायां गेलें.
बोंबीखालील केंस केंसांत ना नष्पात जमा.
बोरें घ्या बोरें, पाठीस लागलीं पोरें.
बोल तर बोल, नाहीं तर हरभऱ्याचें फोल.
बोल गोड वाचे, तुझें काय वेंचे.
बोलण्यांत सुघड, करण्यांत बिघड.
बोलणें थोडें, थुंका फार. [ नाहीं.
बोलण्यांत बोल नाहीं, करण्यांत मेळ
बोलनेकी रेलचेल, खरचनेकी टंचाई.
बोलत्याचे कुळीथ विकतात पण न बोलत्याचे गहूं खपत नाहींत.
बोल बोलतां वाटती सोपे, करणी करतां तिरडी कांपे.
बोलणें फोल झालें, डोलणें वाया गेलें.
बोलल्यावांचून सरत नाहीं.
बोलण्याला सुचेना, काम कसें रेटतें !
बोलाफुलाला गांठ पडली.
बोली मानभावाची, करणी कसाबाची.
बोलूं जाणे त्यास फट कोण ह्मणे ?

## भ.

भगल भावार्थी सात्विक चांडाळ.
भट आहे तों तीथ नाहीं, तीथ आहे तों भट नाहीं. [ दारीं.
भट भिकारी, अवसे पुनवे जाय लोकांचे
भटाची चाकरी कांहींच नाहीं, भुसकट पडलें माहीतच नाहीं.
भणतव्यम् तोबी मरतव्यम्, नही भणतव्यम्
तोबी मरतव्यम् बृथा किं माथाकूट कर्तव्यम्.
भणना गणना चातुर्य तीन्ही बाता स्हेल; कामदहन, मनवशकरण, गगनचढन मुष्केल.
भटाचें नांव कानभट.
भटाची चाकरी, शिळ्या भाकरी.
भटाला आणि तटाला अक्कल नाहीं.
भटाला दिली ओसरी, भट हळूं हळूं पाय पसरी.
भटो, तुमचें पोट कां वांकडें ? उंबर राहिलें म्हणजे झालें. [ चालते.
भटो, बायको कां कराना ? ह्मणे गांवावर
भटो, बायको कां कराना ? म्हणे तुम्हींच कां व्हाना ?
भंडार भरपूर,, काळ कंटक दूर. [ निशाणी.
भपका भारी, खिसा खालीं, मार खानेकी
भर आषाढे घर चुवे, भादरवे भेंस मरजाय, फूटे करम फकीरके, भरी चलम ढल जाय.
भ्रमाचा भोंपळा.
भरम भारी, खिसा खालीं.
भररे पोटा, जारे दिवसा.
भरल्या गाड्याला सूप जड नाहीं.
भरंवशाच्या म्हशीला टोणगा.
भरलें पोटा उंबर कडू.
भलतें ठिकाणीं हगावें, निरपत बसावें.
भलाकर भला होवेगा, सवदा कर नफा पावेगा.
भले भले गेले गोते खात, झिंझुरटें म्हणे माझी काय वाट ? [ कां व्हाना?
भागूबाई दादला कां कराना, ह्मणे तुह्मीच
भांगमे धत्तुर. [ न्हेच लिया.
भांडके साथ खेती कीया, गा बजाके उ-
भांडणाचें तोंड काळें.
भांडणापेक्षां अबोला बरा.
भाड्याचा बैल.
भाड्याचें घर, खालीं कर.

भात भक्षणा पोळी दक्षणा.
भात सोडावा पण साथ सोडूं नये.
भाताचें खाणें काय, बायकोचें मारणें काय?
भावणीचा कासोटा ( सदा पोकळ )
भिऊन वागे त्यास भूत बाधे.
भिकाऱ्याच्या पोराला ओकारी फार.
भिकेची हांडी शिक्यास चढत नाहीं.
भिकेचे डोहळे आठवले.
भिडे भिडे पोट वाढे.
भित्यामागें ब्रह्मराक्षस.
भिंतीस कान, दारास डोळे.
भिन्ना रुचिर्हि लोकः.
भिक्षेचें अन्न पवित्र.
भीक नको पण कुत्रें आटप.
भीड भिकेची बहीण.
भुकी तो सुखी.
भुकेलें भूत कोडबुळ्याला राजी.
भुकेला कोंडा, निजायला धोंडा.
भूताला भूत आणि पानग्याला पीठ.
भूक खाई रूख. [ सोबी पस्तावेगा.
भूमके लड्डू खावेसो पस्तावेगा, न खावे
भेण्याभाव कीं भक्तिभाव.
भोग आला सरता, वैद्य मिळाला पुरता.
भोग भिटे आणि वैद्य भेटे.
भोगलें थोडें, भोगायचें आहे; येवढ्यानें
भोगणें झालें काय ?
भोग्या मिळेल तशी रात्र काढावी.
भोजनभाऊ.
भोळा भाव सिद्धीस जाव.
भोळा भाव, अंधळा देव.

## म.

मऊ पाहिलें कीं कोंपरानें खणलें. [चार.
मढ्याला शिणगार आणि जित्याला उप-
मढ्यावरचें लोणी खाणें.
मढ्यास लांकडें आणि दिवाणास पैसा,
मंत्र थोडा, थुंका फार.
मन जाणावें बोलानें, झाड जाणावें फुलानें.
मन जाणे पापा आणि आई जाणे मुलाचे
बापा.
मन पादशाही पण दैव गांडू.
मनःपूतं समाचरेत्.
मन मानेल तो सौदा.
मन मानेसो कायदा.
मन मे चंगा तो काटोरीमे गंगा.
मन राजा मन प्रजा.
मन हौशी, करम गांडिया.
मना लागीं सुख देतें, देणें सद्गुणाचें होतें.
मनामाजीं सुखी दुःखी, त्याचें चिन्ह
जाणा मुखीं.
मनांत आहे पण बोलतां नये.
मनांत एक जनांत एक. [करी मनीं.
मनन करून पक्केपणीं, शहाणा निश्चय
मनांत मांडे पदरांत थोडें.
मनावर धरील तर वाघाला मारील.
मनासारखा ग्वाही त्रिभुवनांत नाहीं.
मनीं नाहीं भाव, देवा मला पाव.
मनीं मांडे खाणें, मनोरथ पुरविणें.
मनीं मांडे स्वप्नीं पुऱ्या.
मनीं मांडे खाणें, ते कोरडेच कां खावें ?
मनीं वसे तें स्वप्नीं दिसे [मेजवानी.
मनीं संतोषातें मानी, जिकडे तिकडे
मनुष्य ओळखावें संबंधीं कां जरेबंदीं.
मनुष्य जातीचे मोल, कृतीच आहे ऐसें बोल.
मनुष्य आपले कामावरी, राहे हुषार सिंहापरी.
मनुष्याचें पोटीं, आहे गुह्याचें पेटीं.
मनुष्य जाऊं, लाभ होऊं.
मर्दोकी टामटेल, पुरा गांडूका खेल.
मर्दाचें मेर आणि गरतीचें दार.
मरता मरता हातपाय झाडावे.
मरण हक्क आहे.
मरणाला रात्र आडवी,

मला नाहीं ठिकाण, इला मांडून या दुकान.
मला नाहीं, तुला साजेना.
मला भोगा आणि पाटलीण ह्मणा. [ह्मणा.
मला शुभकृत्य करा आणि सवासीण
मशालीपुढें दिव्याचें तेज किती ?
मसणांत गेलें तरी कावळ्यांचा उपद्रव.
मसणीं एकटें नसावें.
मस्करी करितां कुस्करी होती. [पहावें तोंड
महागाईची पाहावी गांड पण सस्ताईचें न
महार गेला, विटाळ फिटला.
महाराची आई चांभार का नेईना.
महाराची उतरावी, आपली चढवावी.
महाराचे देवास फटकुरांची पूजा.
महाराचें लाडकें, आणि गळ्यामध्यें हाडकें.
माकड गेलें लुटी, त्यानें आणल्या दोन मुठी.
माकड मारलें, पाला हगलें.
माकड ह्मणतें माझी गांड लाल. [शीक.
मागतां येईना भीक तर तंबाखू खायाला
मागत्यास दहा घरें.
मागितल्याशिवाय ऋण सुडतें.
माघीं आलें, बेंदुरीं फळ. [जातो.
मांजराचा खेळ होतो पण उंदराचा जीव
मांजरानें दूध पाहिलें, पण बडगा पाहिला नाहीं.
मांजराला उंदीर साक्ष.
माझें घोडें, जाऊं द्या पुढें.
माझें घ्या आणि मला पांचांत न्या. [गरगोटा.
माझे बापाचा वडिवार मोठा, पदरीं नाहीं सा-
माझें माझें आणि भ्रांतीचें ओझें. [हिला.
माझें म्हणतां भागला, आणि निवांत रा-
माझें सावकाराशीं काम कुपटीचें बोल
मीडे करणारणीचा शेंबूड पुसावा.
माणसाचा येवा बरा पण जावा खोटा.
माणसांत न्हाऊ, पांखरांत काऊ.
माथ्याचें दुखणें बरें होईना मुगुटानें, पायाचें ना सुवर्ण जोड्यानें.
मादरचोद देवाला त्रेपन टिकल्यांचा पुजारी.
मानला तर देव, नाहीं तर दगड.
मानलें तर सुख, नाहीं तर दुःख. [मनांत.
मान सांगावा जनांत व अपमान ठेवावा
मानाचें पान गोड.
मानो महतो भ्रन.
माप, पाप.
मामाचे घरीं, भाचा कारभारी.
माय मरो, पण आशा न मरो.
माय मरो मावशी उरो.
माय मरो पण पत उरो.
माया वेडी गू फोडी.
मारणारापेक्षां तारणारा अधिक आहे.
मारल्याचा गुलाम, पळल्याचा काळ.
मारल्याचे हात धरवतात पण बोलल्याचें तोंड धरवत नाहीं.
मारली हांटली येत नाहीं.
मारवाडी कावा आणि आपलपोटेपणा.
मारा भिणें भूत पळतें.
मारावा तर हत्ती व लुटावें तर भांडार.
मारीन कीं मरेन.
मारील त्याची तरवार, करील त्याची विद्या.
मारून मुका मिळत नसतो. [नको.
माशाचे पेराला पोंहायाला शिकवायाला
माशानें गिळलेलें मोतीं मिळणें कठीण.
माहेरची पेज आणि सर्वांगास तेज.
माहो आणि हिंवाचा लाहो.
माळ्याची मका आणि कोल्ह्याचें भांडण.
मिजास पादशाहाची अवलाद भडमुंजाची.
मिजास पादशाहाची, पण चाकरी मशालजीची. [घाण.
मिठाची केली वाण, लोणच्याची झाली
मिण मिण दिवा आणि कृपणपणाची सेवा.
मित्र पैकेकरी, तो निधानापरी. [मागणें.
मित्रालागीं युक्ति करणें, कर्ज देउनियां
मिया मूठभर व दाढी हातभर.

मिशीला शीत लावून वागावें.
मिष्टान्न भरण करी, त्यास दुखणें येतें भारी.
मिळवायचें सोपें पण जिरवायचें कठीण.
मिळाले बारा भाई, लुटली चंदाबाई.
मिळालेली उत्तम कीर्ति, सदां लोकीं प्रकाशती.
मी तुझी खीरतुपडी खाईन.
मी तुझें बारसें जेवलों आहें.
मीपणा टाकशील तर देवपणा पावशील.
मी मारीत नाहीं, माझी काठी मारते.
मी हंसें लोकाला, शेंबुड माझ्या नाकाला.
मुख पाहून मुशाहिरा.
मुंगसि मुताचा पूर. [ लांकडें फोडूं नयेत
मुंगी होऊन साखर खावी, पण हत्ती होऊन
मुतांत मासोळ्या मारणें.
मुमे सो पाताडमे.
मुरगी मरे, बच्चे दाणादाण.
मुलांचे लाड करावे, लाडानें वेडें न करावें.
मूर्खा स्वहिताचें गाणें, ज्ञानी लोक हिताहित जाणे.
मूर्ख कांहीं सुचवितो, सुज्ञा उपयोग होतो.
मूर्ख मनांतलें सांगतो, शहाणा राखून ठेवितो.
मूर्खाचें अंतःकरण, उथळ असतें जाण.
मूर्खाचें बोलणें, तरंगाप्रमाणें.
मूर्ख फार बोलतो, आपलें हातीं फसतो.
मूर्ख आणि वेडा, त्यांची साक्ष सोडा.
मूर्ख लवकर कोप करितो, शहाणा विवेकें आवरितो. [ वर पाणी.
मूर्खाला काहाणी आणि उपड्या घड्या-
मूर्खास बोध, पालथे घागरीवर पाणी.
मूर्ख गधें कां असतात ?
मूर्खाहातीं कोलीत. [ ईशारा जाणा.
मूर्खा असे सदां टोंचणी, शहाण्यास
मूर्त जाईल पण कीर्ति जात नाहीं. [पळावें.
मृगाचें आधीं पेरावें आणि बोंबेचें आधीं
मुलांचें नाहीं जन्मपत्र त्यास कैसें कूळ गोत्र ?
मूर्ख वैद्याची मात्रा, वैकुंठची यात्रा.
मूर्खस्य हृदयं शून्यं. [ आपणास.
मूर्खाजवळ मांडल्या राशी, दोन्ही हारी
मूर्खापुढें वाचली गीता, रात्रीचा गोंधळ बरा होता.
मुमें घांस, शिरपर टोला.
मुये शेरसे जिती बिल्ली भली.
मुरखकी सारी रात, चतरकी एकच बात.
मुलाची धांव आईपावेतों.
मुलाला द्यावें वाटींत, मूल मागें नरटींत.
मुलांस लाड खाण्याचे, विद्येचे नाहींत.
मुलूखचें नांव आणि आपलें गांव.
मुसळाचें धनुष्य होत नाहीं. [तो पूर्तेपणीं.
मूल भिक्षुक आणि ऋणी, यांस समज नस-
मृगाचा लावणी व हस्ताची उगवणी. [तरी.
मूर्ख मोठी कल्पना करी, अल्प प्राप्त होय
मुर्खापाशीं पैका येतो, अनादरें निघून जातो.
मेंगा दादला, थानांचा काळ.
मेमटा घेतो चिमटा भडभड्याचा बोभाटा.
मेणबत्ती स्वतः जळती, प्रकाश दुसऱ्या देती,
मेलास म्हणून चंद्रास खळें पडत नाहीं.
मेलें घोडें व जितें गाढव बरोबर आहे.
मेलें मेंढरूं आगीस भीत नसतें.
मेल्या आईचें दूध प्याला नाहीं.
मेल्याचे डोळे पंजा एवढे.
मेल्या माणसास कशाची बुद्धि ?
मेल्या म्हशीस बारा शेर दूध.
मोठा मनुष्य मान हालवे, मूर्ख तेणें हर्ष पावे.
मोठा घोडा, मस्तीवान थोडा. [ तांना तो.
मोठ्या वाऱ्यानें विझतो अग्नि लहान अस-
मोठ्या झाडाला वारा लागतो.
मोठ्याच्या गांडींत शिरूं नये

मोठ्याचें सर्वच मोठें. [ जीव द्यावा.
मोठ्यानें धरिलें तर काय तें करूं द्यावें किंवा
मोठें कार्यीं अल्प यत्न चालत नाहीं.
मोडली तर काडी, फुटला तर डोळा.
मोनी गाय, पोटांत जाय. [ शोभत नाहीं.
मोर नाचतो म्हणून लांडोर नाचते परंतु
मोलाचा भात आंखडला हात, फुकाची
कढी धांवून धांवून वाढी.
मोहोर सोडून घ्यावी व चिंधी फेंकून द्यावी.
मोळा पोटीं केरसुणी.
मौर्ख्य न प्रगट करावें, आपलें मनांत ठेवावें.
मौन धारण करतो, तो शहाणा दिसतो.
मौनं सर्वार्थसाधनं [ छबदार.
म्हणही केवळ अलंकार, भाषणीं दिसे
ह्मणेल तो चुकेल.
म्हातारपणीं, ढवळा मणी.
म्हातारा दादला, कुंकवाला आधार.
म्हातारा बसे, आपोआप वासे. [ राहत नाहीं.
म्हातारीनें कोंबडें लपविलें म्हणून उजेडायचें
म्हातारी मेल्याचें दुःख नाहीं, परंतु काळ
सोकावतो.
म्हाताऱ्याला कंठाळ्यांत घालून न्यावें.
ह्मैशीचीं शिंगें ह्मशीस जड नाहींत.
म्हैस धन्याला दूध देण्याकरितां फळत
नाहीं, तर आपल्या खाजेकरितां फळते.
म्हैस बसली सखलीं, दोन्ही खर्कां चुकलीं.

## य.

यजमान सुस्त आणि चाकर मस्त.
यजमानाचा रोजगार गेला तरी आचा-
ऱ्यास सवा मणाची धारण.
यत्न करून पहावा, फळ देवाधीन.
यत्न जोड, आळस मोड.
यत्नेंकृते यदिनसिध्यति कोत्र दोषः
यत्नें आस्था धरून, रिती घेई प्रपादून.
यतो रूपं ततो शीलं.
यथा अनुष्ठान तथा सिद्धी.
यथा देशस्तथा भाषा.
यथा बीजं तथांकुरं.
यथा भूमिस्तथा तोय.
यथा राजा तथा प्रजा.
यथा वृक्षः स्तथा फलं.
यथौषधं स्वाद हितंच दुर्लभं.
यदन्नं भक्षयेन्नित्यं जायते तादृशी प्रजा.
यद्यपि सिद्धं लोक विरुद्धं नाकरणीयं
नाचरणीयं.
यद्वातद्वा विष्याति.
यशाचा विडा उचलणें.
यस्यनास्ति स्वयं प्रज्ञा शास्त्र तस्य करोतिकिं?
यः पलाय सजीवाति.
यात्रा सुखाची, कामें दुःखाचीं.
या बोटाचा थुंका त्या बोटावर तेव्हांच.
यावत् तलं तावत् आख्यानं.
येई वेळे, खाई केळें.
येगे कळा आणि बैस माझे नळीं.
येईना ना जाईना आणि उगीचही राहीना.
येता व्हावा, जाता न व्हावा.
येत्याचा सोबती, जात्याचा बोळावा.
येतील वांग तर फिटतील पांग.
येन केन प्रकारेण प्रसिद्ध पुरुषो भवेत्.
येरे कुत्र्या, चाव माझ्या पायाला.
येरे दिवसा भररे पोटा. [ गल्या.
येरे माझ्या मागल्या, कण्या भाकरी चां-
येरे येरे वाऱ्या, धूळ घेऊन जा काळ्या.
येरे येरे पावसा तुला देतो पैसा, पैसा
झाला खोटा पाऊस आला मोठा.
योजकस्तत्र दुर्लभः
यों करेंगा, त्यों करेंगा.

## र.

रंगी रंगली, देंठीं पिकली.
रगाड्यांत गेलें काय नी आलें काय,

राजाचा गज. [ काय मारतो?
रडत राऊत घोड्यावर काय बसतो व तीर
रडती बायको व हंसता पुरुष.
रडत्याची शेती, बोंबलत्याचें दुभतें.
रडतें पोर व गळतें घर.
रडत्याचे डावे बाजूस व हंसत्याचे उजवे बाजूस बसूं नये.
रडून घर घेणार.
रडून मान आणि पडून दंडवत.
रणवार्ता श्रुतं रम्यं.
रत्न उकीरड्यांत पडलें तरी परीक्षक त्याची योग्यता समजतो.
रय्यतकी नेकी और बदी अजमाके रय्यतकु खुषी रखना ये पादशाहकू लाजम है.
रहावें तेव्हां रुसूं नये व जावें तेव्हां पुसूं नये.
रक्षिला एक पैसा, दोहोंचा लाभ जैसा.
राइभर नाता और गारीभर आशयानी.
राईचा पर्वत व रंकाचा राव.
राग खाई आपणास, संतोष खाई दुसऱ्यास.
रागाची स्वारी अश्वाचे पाठीवर.
रागीट स्वभावाचा, कांहीं ना उपयोगाचा.
राजदरबारांत गुणी मनुष्यास पुष्कळ शत्रू होतात.
राजपोर कीं रांडपोर.
राजमे राज मेघराज, फूलमे फूल कपासीका और दूधमे दूध माका.
राजविलासी आणि भोंपळा गळ्याशीं.
राजा उदार झाला, हातीं भोंपळा दिला.
राजा एकीकडे आणि आपण भलतीकडे.
राजा करील ती पूर्व दिशा.
राजा कालस्य कारणं.
राजा नीतिहीन, जैसी नदी पाण्यावीण.
राजाची धांव राजाप्रमाणें, गरीबाची धांव त्याप्रमाणें.
राजाची राणी पण ती पाटलाची मेहुणी.
राजाची राणी, पिते परळानें पाणी.
राजाचीं लेंकरें काय खातात ?
राजाचें दुष्कर्म राजाला भोंवतें आणि प्रजेलाही भोंवतें.
राजाचें नेसणें तें परटाचें गांड पुसणें.
राजा बोले दळ हाले, गरीब बोले दाढी हाले.
राजा मेहेरबान, गद्धा पेहेलवान.
राजा बोलेल तो न्याय.
राजाला दिवाळी काय माहीत?
राज्या अंतीं नर्क.
रांडबिंड ह्मणा पण पोटभर वाढा.
रांड, भांड, भैंसा, बिघडे तो होय कैसा ?
रांडे घरीं मांडे.
रांडेच्या पोरास विटीदांडूचा खेळ.
रांडेजवळ रांड गेली आणि फटरांड झाली.
रांडेपरती शिवी नाहीं आणि शिरापरत दंड नाहीं.
रात गये और बातही गये.
रात्र थोडी, सोंगें फार.
रात्रंदिवस कांडा, हातीं आला कोंडा.
रात्रीं खाती तूप, सकाळीं पाहती रूप.
रात्रीं खातो वाल, सकाळीं फुगवितो गाल.
रांधा, वाढा, उष्टी काढा.
रांधावें तसें जेवावें, करावें तसें पाळावें.
राबेगासो चाबेगा.
राम्यास गळू, लक्ष्यास अवधण.
राव करीत नाहीं तें गांव करतो. [ मिशा.
रावणाची हे दुर्दशा, आह्मी खालविल्या
रावणाच्या आईला आवळ्याचें दहीं.
रावणास भिकेचे डोहळे.
राव नेणें मुकळ दुकळ.
राव पहावा, कां देव पहावा.
रास्तगो मुफलस, मजलसमे झूटा.
राळ्याचा थाळा करणें.
राळ्याचें ढासलें आणि भुतानें तोंड वासलें.
रिकामचोट, गांवास उपद्रव.
रिकामटवळी, हातीं नाहीं डवली.

रिकामपणाच्या अंतीं, अनेक कल्पना सुचती.
रिकामा आवा, कडकड चावा.
रिकामा न्हावी, कुडाला तुंबड्या लावी.
रिकामा सुतार कुलें तासी.
रिकाम्या पोटास कान नसतात व रात्रही शहाणपण आणिते.
रिणको धनकोचा दास.
रेडा तर रेडा, म्हणे धारभर ओढा.
रेड्यापाड्याचे झुंज, झाडा माडास मरण.
रेड्याचे जोत आणि बायकांचें गोत.
रोख, ठोक, भवानी चोख.
रोगाचें घर निरुद्योग, मृत्यूचें घर रोग.
रोगी मेल्यावरी, वैद्य आला घरीं. [ युद्ध.
रोग्यावैद्याचें औषध, मोडक्या शस्त्राचें
रोग्याला कुपथ्याची चाड.
रोज मरे त्यास कोण रडे.
रोजगारांत कर्ज आणि तारुण्यांत व्याधि मग सुख तें लागावें कधीं.
रोते क्यों ? सूरतहै वैसी.
रोहिणी राजे, मृग गाजे, आर्द्रा वाहे पूर- सहदेव कहे भाडळी घर घर बाजे तूर.
रंगाच्या मोटा बांधणें.

## ल.

लंकडी बिगर मकडी नहीं वठणी आती.
लंकेची पार्वती. [उपयोग ?
लंकेंत सोन्याच्या विटा आहेत म्हणून काय
लगामाला मागें, दाण्याला पुढें.
लग्न आलें घरीं, मग मांडवाची तयारी.
लग्नाचे पाठीशीं आणा.
लग्नें केलीं नाहींत पण मांडवाखालून तर गेलों असेन.
लंगडें तें लंगडें आणि गांवाशेजारीं चरेना.
लमाणभाऊ आणि कांदेखाऊ.
लटकें पण नेटकें.
लबाड बायचानें जिंकावा.
लबाडाचें खरें कोण मानितो ?
लवण तेथें जीवन.
लष्करच्या भाकरी कोण भाजील?
लष्कर दोनशें, न्हावी तीनशें.
लहानच हिरा बरा, थोर गार कशाला !
लहान तोंडीं मोठा घांस.
लहानाचे लहानच सोयरे.
लहान तें छान, मोठें तें खोटें.
लहानपणीं दुःख, मोठेपणीं सुख.
लहान मूर्ति पण थोर कीर्ति.
लहानाची उपेक्षा करूं नये.
लक्ष प्रदक्षणा आणि पैसा दक्षणा.
लक्षाधीश किंवा कक्षाधीश.
लक्षेश्वरी कां भिक्षेश्वरी. [ मिळे अन्न.
लक्ष्मी नामाभिधान, दर्शन जाहल्या न
लांकडाचीं आधोली मोजील तर खंडो- खंडी, फोडली तर एक भाकरही भाज- णार नाहीं.
लांकडावांचून लांकूड वठणीस येत नाहीं.
लांकूड सायाचें, लेंकरूं रायाचें.
लाख नसावी पण साख असावी.
लाखाची मत्ता, काडीची सत्ता.
लाखाचे बारा हजार करणें.
लाखेसाठीं मणी फोडणें. [ ढगाकडे बघा.
लागतील मघा तर चुलीपुढें हगा, नाहीं तर
लागला तर तीर, नाहीं तर तुक्का.
लागो, भागो, दिवाळी.
लांच, लुचपत, दक्षिणा, घेईजे तत्क्षणा, नाहीं तर हात लावी दूषणा.
लाज नाहीं मना, कोणी कांहीं म्हणा.
लाजू लाजू मेली, त्याच गांवीं गेली.
लाडका पूत आणि करंड्यांत मूत.
लाडें लाडें, केलें वेडें.
लांडें लुडबुडें आणि नाचे पुढें पुढें.
लांडा मुंडा हात, दाल्ला करी भात.

लाथ बुक्की, सदा सुखी. [ काढीन.
लाथ मारीन तिथें भात ( किंवा पाणी )
लातोके देव बातासे नई माने.
लाभ पांचाचा आणि वस्त्र दहाचें.
लाभापेक्षां भोळ्याची आशा फार.
लाभालाभौ, जयाजयौ.
लाभाविणें मैत्री तोडूं नये.
लालाभाईचा चुरमा आणि शेटजी सडक.
लांव तरी सासू, डंकीण तरी आई.
लावली राख, झाली पाक.
लावशील लळा तर पडेल गळा.
लाळेनें चणे गोड करावे. [ मळा.
लिहितां हातवळा, गातां गळा, शिंपतां
लुटलासरे परटा, तो ह्मणे लुटल्या आयाबाया.
लेंकरां गुरांनीं वाडा साजरा. [णारी.
लेंक असली जरी तरी ती परघरीं जा-
लेकीस बोले, सुनेस लागे.
लेखणी बहादरापेक्षां हात बहादर जास्त.
लेनाले गंगेस मिळतां गंगा जाहले.
लेनेकू ना देनेकू, लढनेकू मजबूत. [ ण.
लोकां सांगे ब्रह्मज्ञान आपण कोरडा पाषा-
लोकां ऐकवी चतुर वाणी, करणी क-
रतो मूर्खावाणी.
लोकां सांगावें तसें स्वयें आचरावें.
लोकांनीं घातली सरी ह्मणून आपण घालूं
नये दोरी.
लोक आणि ओक. [ देणार ?
लोक ह्मणून खाणार, बाप ह्मणून कोण
लोटा घडतां येईना आणि आहिरीचा इसार.
लोक ह्मणती बावा बावा नकळे गुला-
माचा कावा.
लोभ लचकला डोळा पिचकला.
लोभी मनुष्याची श्रद्धा, तृप्त होईना कदां.
लोभ्र मनिष्याची न माहे उपमा.

# व.

वक्कर थोडा, दिमाख बडा.
वक्कल, वकील आणि वैद्य.
वचनें किं दरिद्रता.
वजा वाटोळं, डोईवर गाठोळें. [ल वडास.
वडाची साल पिंपळास व पिंपळाची सा-
वड्याचें तेल वांग्यावर. [ रोग.
वडाला आलीं वडफळें, कावळ्यांस आला
व्यभिचारी मनीं, स्वस्त्रीला तैसें गणी.
वरण दाटणी आणि बायको आटणी.
वरमाय शिंदळ, मग वऱ्हाडणीकडे कायबोल?
वरवर आर्जव करी, घात त्याचे अंतरीं.
वरल्या वैद्याची तुटली दोरी, खालचा वैद्य
काय करी ?
वरातीमागें घोडें, व्याह्यामागें पिढें.
वर्षें साठ, विठोबांनें केली पाठ. [जैसा नाला.
व्यसनी पुत्र कुरली नाला, शुद्ध जळांतुनी
वस्त्रा आड जन नागवे. [ ला हातीं.
वस्तूची नाहीं माहिती, असून काय मूर्खा-
वहूना हली आणि वाफा शिंपला.
वळवणी आलें आणि तळवणी घेऊन गेलें.
वृद्धा नारी पतिव्रता, ढवळा नंदी गुणवंता.
वृक्षामध्यें एक साया, वरकड साऱ्या आया
बाया. [ माथा.
वाईट जागेवर उवां जातां, वाईटपणा येतो
वाईटापेक्षां चांगलें बोले, चांगल्यानें मा-
न हाले.
वाईट चांगले बोल, त्यांचें समान तोल.
वाकडीना तिकडी, गांवची भाकर.
वांकडें मेढीस वांकडेंच नेम करावें लागतें.
वांकडें झाडीं, छाया वांकडी.
वाघ बकरीं एके जागीं पाणी पितात.
वाघ ह्मटलें तरी खातो, वाघोबा ह्मटलें तरी
खातो. [ रिती खडे.
वाघ सांपळ्यांत सांपडे, बायकामुळें मा-

वांझेस कातबोळ कशाला ?
वाटाण्याच्या अक्षता लावणें.
वाटी नको, करवंटी पाहिजे.
वाटेचा फांटा, तीन गांवचा हेलपाटा.
वाटे निराळे बसावें.
वांटी त्याला पाटी.
वाण गाईचा, प्रजापती गाढवाचा.
वाण्याचा गूळ वाण्यानें चोरून खावा.
वारा पाहून पाठ द्यावी.
वाऱ्यानें आलें व वावटळीनें गेलें.
वाऱ्या वाऱ्या धोपट, खुंटीचा पोपट.
वाऱ्यावर वरात, भुसावर चिट्टी.
वाऱ्यावर वरात आणि दर्यावर हवाला.
वाऱ्यानें वाळतो, शिंकीनें भिजतो.
वासना तसें फळ.
वासरांत लंगडी गाय प्रधान.
वाहते गंगेंत हात धू.
वाहिली ती गंगा, राहिलें तें तीर्थ.
वाळकावर सुरी, सुरीवर वाळूक, पण
वाळूकच कापलें.
वाळूंत मुतलें तर फेंस ना पाणी.
विकटोपर्यंत अध्ययन.
विकत श्राद्ध घेऊन सव्य अपसव्य करणें.
विंचवाचें बिऱ्हाड पाठीवर.
विणारणीच्या वेदना विणारीण जाणें.
विद्वान् सर्वत्र पूज्यते. [ नहीं.
विद्वानोको शिंग नहीं, और मूर्खको पुच्छ
विद्याधनं सर्वधनं प्रधानं.
विनाशकाले विपरीत बुद्धि.
विरक्तस्य तृणं भार्या.
विशी विद्या, तिशी धन. [ ही जळतें.
विस्तवामध्यें ओलेंहीं जळतें आणि कोरडें
विस्तवावर तेल घालणार. [ गोडें ?
विहिरींत खारें तर पोहऱ्यांत कोठून येईल
विज कडकली पण वडावर पडली.
वेडा झाला व कामांतून गेला.
वेडी गांड, बोंचा भिंगारा. [ पाहिजे.
वेडीचें सोंग घेतलें म्हणजे ठाव फोडला
वेडेचार, गाढवाला मंगळवार.
वेड्यांचा बाजार, खुळ्यांचा शेजार.
वेडे मेजवान्या करिती, शहाणे स्वस्थ
बसून खाती.
वेताळाचेच भुतावळ.
वेलीस दुःख नाहीं, बाळकास दुःख नाहीं.
वेळ आली पण काळ नाहीं आला.
वेळ ना वखत, गाढव गेलें भोंकत.
वेळ निघून जातो पण शब्द राहतो.
वेळेवर वेळ, शिमग्यावर खेळ.
वेळेस चुकला तो मुकला.
वैद्य रोगी, भुटा जोगी.
वैद्याचें वाटलें आणि संन्याशाचें गुंडलें
कोणास समजत नाहीं.
व्यक्ति तितक्या प्रकृति.
व्यसनेषु सख्यम्.
व्याज दिसे, मुद्दल भासे.
व्याजाच्या आशेनें मुदलाचा नाश.
व्याजाला सोकला, मुदलाला मुकला.
व्याप तितका संताप. [ डोईवर भारा.
व्यापार करितां सोळा बारा, उदीम करितां
व्याप्तीवांचून प्राप्ति नाहीं.
व्याही पाहुणा आला तरी रेडा दुभत नाहीं.

## श

शंख अडोशी, शंख पडोशी, शंख शंखके
भाई; शंख घरके व्याह होई तो शंख
मिले जांवाई.
शंखोबा तर ओबा, दे दोन हजार तर घे
तीन हजार, देतोस काय तर घेतोस
काय ?
शतं भीष्म.
शतश्लोकेश्च पंडितः.
शनैः पंथाः शनैः पथाः

शब्दाचा सिंधु पण अकलेचा एक बिंदू.
शंभर दिवस चोराचे, एक दिवस सांवाचा.
शंभर शहाणे पण अक्कल एक. [वत नाहीं
शंभर सुवेतें पुरवतील पण एक दुवेत पुर-
शरण आलेल्यास मरण चिंतूं नये.
शष्प देणें न शष्प घेणें.
शष्पें काढल्यानें मढें हलकें होत नाहीं.
शष्पें धुतलीं म्हणून रेशीम होत नाहीं.
शहरांतलें व्हावें कुत्रें पण गांवढ्यांतलें होऊं नये माणूस.
शापादपि शरादपि.
शालजोडीला रकट्याचें ठिगळ.
शास्त्र सांगे आणि चुलीशीं हगे.
शास्त्राद्रूढिर्बलीयसि.
शास्त्रांत पढावें आणि शेतांत खपावें.
शाहणा नडतो आणि पोहणार बुडतो.
शहाण्याचें व्हावें चाकर पण मूर्खाचें होऊं नये धनी.
शहाण्यास इशारत, मूर्खास टोंचणी. [चा.
शहाण्यास मार शब्दाचा, मूर्खास टोणप्या-
शहाण्याचे श्रोते, गाढवाचे चुलते.
शहाण्याची बलाई दूर.
शहाण्याची लाथ, मूर्खाची खेव.
शहाण्यास एक बात, मूर्खाला सारी रात.
श्वास तों आस. [दोरी कामास येत नाहीं.
शिकवलेली बुद्धि आणि बांधलेली शि-
शिंक म्हणे मी जोशी, पाद म्हणे मी परदेशी.
शिंक्याचें तुटलें, बोक्याचें बनलें.
शिंग तिकडे शिंगोटी, गांड तिकडे लंगोटी.
शिंगें मोडून वासरांत शिरणें.
शिजलेला भात जेवायास काय? [नाहीं.
शिजे तों धीर धरवतो, निवेतों धरवत
शिंदळ धरावी खाटीं, चोर धरावा हाटीं.
शिंदळाची आई, गुराख्याचें आलें, आणि कुणब्याचें गेलें.
शिंदळीला पोराची कसली आशा?
शिंदळाची आई, चोराची नाहीं.
शिपायाच्या पोरा, तुला कशाला हावी गुरुकिल्ली, छातीवर बंदूक, पड खालीं.
शिंपळगांवचा पिंपी.
शिमगा गेला आणि कवित्व राहिलें.
शिमग्याच्या आधींच बोंब.
शिमग्याच्या तेलाला धार ना बोळ.
शिलंगणाचें सोनें पाहिजे त्यानें लुटावें.
शिलेदार बुवा, सणकाडीचा दिवा.
शिवतां सरेना, खातां पुरेना.
शिष्यापराधे गुरोर्दंडः. [पोरानें गोड.
शिळी भाकर ताकानें गोड, वाईट बायको
शिळें पाकें खाल तर तुह्मी बांगडीसें व्हाल.
शीर सलामत तों पगड्या पचीस.
शुचिर्नारी पतिव्रता.
शुचिर्भूमि गतं तोयं.
शुभ बोलत असावें.
शुभस्य शीघ्रं. [नके अधिकारी.
शूद्र, गव्हार, ढोल, पशू, नारी ये सब ताज
शूरस्य मरणं तृणं.
शेकणें हा अर्धा वैद्य आहे.
शेग मिरे, गोकुळ अष्टमी.
शेजेची केली आस, तिळतिळ तुटे मांस.
शेजीं नांदे, कांजी तर लाधे.
शेजीचें उसणें मवेंच देणें न देईल तर तिच्या पूर्वजाला उणें. [णतात.
शेजारणी बाई तुह्मा ना मला शिंदळ म्ह-
शेजाऱ्याचें पोर पाजाऱ्याचे घरीं गहाण.
शेजाऱ्याच्यानें घरें आणि पाहुण्याच्यानें पोरें होती तर मग काय?
शेजीनें अडविलें आणि पुढें गाढव दडविलें.
शेजीविणें सरेना आणि घडीभर पटेना.
शेजेगांवचा माळी, आठ दिवसाची पाळी.
शेट शहाणा आणि बैल पाठबळ.
शेठीचें आणि माझें एकोत्तरशें.

शेट सवाशेर, लिंग अडीश्री.
शेंडीची आणि शेटांची रास एकच.
शेंडी झाड कीं पान वाढ.
शेंडी झाडली कीं भाकर मोडली.
शेंडी तुटो की पारंबी तुटो.
शेण पडलें तर माती घेऊन उठतें.
शेणी बुडाल्या, थापे तरले.
शेणीस जाऊं का सशास जाऊं ?
शेत वाण्याचें, गांव सोयऱ्याचें.
शेता आड चोरी, नवऱ्याआड शिंदळकी.
शें तों भें, हजार तों बाजार, लाख तों कांख.
शेंदरें माखिला धोंडा, पूजा करिती पोरें रांडा.
शेरास सवाशेर आहेतच.
शेला पांघरला, हिंवानें मेला.
शेळीचा जातो जीव, खाणारा ह्मणे वातड!

## ष.

षोडश वर्षा भवेत् कन्या अप्सरा सुंदरी भवेत्.

## स.

सकाळीं सौभाग्यवती, संध्याकाळीं गंगाभागीरथी.
सगळें गलबतांत अर्धी सुपारी माझी.
सगळे पालखीपदस्थ होतील तर भुई कोण होईल ?
सगळें मुसळ केरांत.
सगळ्यांचीं पावलें हत्तीचें पावलांत.
संगतगुण कीं सोबत गुण.
संग्याची चेली, मायेशीं मात्रागमन.
संजगनी रोकडी, कंवर कांगे वांकडी ?
सजणा जाय घोकीत राहे, चोरा जाय निचिंत राहे. [काळीं.
सटवीनें लिहिलें भाळीं तें न चुके कदा
सण ना वार, नकाटीचा बुधवार.
सणांत सण, नवलाईचा सण.
सत ना गत.
सतत कुरडतां उंदीर, खंडी मोठाही दोर.
सत्यमेव जयते.
सत्पात्रीं दान.
सदां पीक आणि सदां भीक.
सदां सावध रहावें, भिऊन आर्जव्या वागावें.
सध्यांची साळी, पिकावी दुकाळीं.
सज्जन दुःखातें न मानी, दुःख वसे दुर्जनास.
सतीच्या दारी बत्ती व शिंदळीच्या दारी
सत्तेपुढें शहाणपण चालत नाहीं. [हत्ती.
सदा मरे त्यास कोण रडे.
सदा संतुष्ट मनसः सर्वाः सुखमयादिशः
सकट घोडे बारा टक्के.
सब मिलना पण लंगोटीयार नही मिलना.
सभ्यांस भूषण, चोरांस दूषण.
स्वभाव वांकडा, तो नीट न होय बापडा.
स्वभावानें जो चांगला, सदां सुख असे त्याला.
समर्थाची सांठवण पण दुर्बळाची नागवण.
स्वबालकाचें पोषण, नाहीं वाटत कठीण.
समर्थाचे घरचें श्वान, त्यास सर्वही देती मान.
समुद्रांत जाऊन कोरडा.
सरडाची धांव कुंपणापर्यंत.
सरली सुगी, बसली उगी.
समयानुसार वर्तणूक.
सर्व सोंगांत पैशाचें सोंग कठीण. [ खरी.
सर्व जनाला मित्र करी, त्याची मित्रता नसे
सर्वांपुढें जाववतें पण दैवापुढें जाववत नाहीं.
सब शहाणे, अक्कल एक.
सब सुनारकी एक लव्हारकी.
सबसे जीव प्यारा.
सशाचे शिकारीस वाघाचा सरंजाम.
सहज जिची लीला, तीस कशास पाहिजे भांग टिळा.
सहज पडे, दंडवत घडे.
सळो की पळो.
साखरेचा खाणार त्याला देव देणार.

सार्टेलोर्टे, जन्माचें खोटें.
साठी बुद्धि नाठी.
सांपडला तर चोर, नाहीं तर बादशहाहून [ थोर.
सारा गांव शेती पण कण न ये हातीं.
सारी रात्र जागले, कांदे वांगीं रांधले.
सावकाराची सौख्य गती, वाऱ्या वादळावरती.
सासरीं शिवरात्र, माहेरीं नवरात्र.
सासू गेली ठीक झालें, घरदार हातीं आलें.
सिंह नखें महाक्रूर, लेखणी त्याहून निष्ठूर.
सीता गेली वनवासा, मागें लागली अवदसा.
सुखाचा जीव दुःखांत घालूं नये.
सुखें घानो पानी पढा.
सुतानें स्वर्गास जाणारा.
सुंदरी सदाचरणावीण, नासलें दुधाप्रमाण.
सुंदर स्त्री आणि समाधान, मनुष्याचें उत्तम धन.
सुनेस सासू व मुलास पंतोजी.
सुईमागें दोरा.
सुईचे तोंडीं मृत्तिका.
सूर्या पोटीं शनैश्वर.
सुकुमार स्त्री चोरवाट धरी, मनुष्याचे [पर खालीं करी.
सुख सांगावें जनाला, दुःख सांगावें मनाला.
सुस्त असतां पाहरेकरी, गलीम येतो भीतरी.
सोयरा पहावा रुसून, सोनें पहावें कसूनें.
सोनेकी चेडी हात लगी है.
सोनेका गडवा और पितलेकी पेंडी.
सोनाराकडून कान टोंचला ह्मणजे दुखत [नाहीं.
सोनार व झारेकऱ्यांशीं गांठ.
सोनार, शिंपी, कुळकर्णीअप्पा, तिघांची संगत नकोरे बाप्पा.
सोंगासारखी संपादणी.
सो दिन चोरके, एक दिन सावका.
सोन्याची सुरी, नका घालूं उरीं.
सकंटीं उपयोगीं पडतो, तोचि मित्र खरा [असतो.
स्वस्थ आहे आपले मनीं, त्यास निद्रा लागे दिनरजनी.
स्नानसंध्येचा कंटाळा, हातीं सोंकटीचा [चाळा.
स्वतः मेल्यावांचून स्वर्ग दिसत नाहीं.
स्वतः ज्ञान नाहीं व सांगितलेलें ऐकत नाहीं.
स्वदेशीं चोरी व परदेशीं भिक्षा.
स्वस्थपणें थोडें खाणें, तेंची अंगीं लागणें.

## ह.

हगलें ना पोट गेलें.
हगत्यानें लाजावें, कीं बघत्यानें लाजावें.
हगवणीची गांड, तंबाकूचें तोंड.
हगायला गेला, तिकडे गांड विसरला.
हगून आलों तरी तुरी शिजल्या नाहींत?
हजार बोडक्या, एक केसकरीण.
हजीर तो वजीर.
हड्यावण आणि गजकरण.
हत्ती पोसवेल पण बायको पोसवत नाहीं.
हथी हजार दुबले तनका, ताभी सव्वा लाख टक्केका.
हरण केलेला पदार्थ, जवळ नाहीं राहत.
हरामाचा माल जिरत नाहीं.
हरोज नया कुवा खोदना, और नया पानी [पिना.
हलका द्रव्याश्चर्य मानी, मोठा कीर्तिनें वर्णी.
हलक्याचें छेडावें, वाईट ऐकून घ्यावें.
हलक्याचे पोटांत कांहीं गुह्य राहत नाहीं.
हलक्यास त्रास देऊं नये.
हलकें नांव पडलें ज्याचें, जन्मवरी तेंच [त्याचें.
हलवायाचे दुकानीं राहून उपाशी.
हसता पुरुष, रडती रांड, अंतरीं असती सदा [द्वाड.
हळूंहळूं पुरती चाल, धांवणाराचे मोठे हाल.
हळूं चाल वाटे, मोठा पल्ला गांठे.
हातापायासाठीं, ठेवा कांहीं गांठीं.
हाथी निकल गयो, दूम अटक रही.
हींगजी याय, दगडु गंधाय.
हुद्दा आपले हातीं आहे तर दुष्टाशीं सावध [राहे.

हौंदसे गयी, तों बुंदसे आती नही.
हाताखालचे लोका, तुच्छ मानूं नका.
हा घोडा आणि हें मैदान.
हाडाचा मणी, रक्ताचें पाणी.
हा सूर्य आणि हा जयद्रथ.
हातानें थट्टा करणें, हीं पाजीचीं लक्षणें.
हातचा मळ. [डला अबोला.
हात ओला, तर जग भला, नाहीं तर प-
हातचें घालविणें, निराश बसणें.
हातचें सोडून पळत्याचे पाठीं लागूं नये.
हातचे सोडावें, दैवावर घालावें, मूर्खानें सांगावें तसें त्यानें चालावें.
हातचे कांकणांस आरसा कशाला?
हातीं आला, तो लाभ झाला. [तो धडका.
हातीं नाहीं अडका, बाजारांत घ्यायला जा-
हालवून खुंटा बळकट करणें.
हातको हाथ पहचानें.
हाजरकु हुजत नही.
हात पाय लुले, तोंड चुरचुरा बोले. [मेढ.
हातीं लागली चेड आणि धर मांडवाची
हास्य विनोद रुदन, स्त्रियांचे स्वाधीन.
हाताबोटांवर काम येतें, शेवटीं फसतें.
हिरा उकिरड्यांत पडला तरी चमकतां-ना राहत नाहीं.
हिशेब कवडीचा, बक्षीस लाखाचें.
हिऱ्याची परिक्षा घणावांचून होत नाहीं.
हिशेबास रती, बक्षिसास हत्ती.
हिशेबी द्यावें घ्यावें, बापालाही न सोडावें.
हिंमत धरणें, मग हरणें किंवा जिंकणें.
हुराळली मेंढी, लागली लांडग्याच्या मागें.
हेवा करणाराशीं दोस्ती, करूं नये कल्पांतीं.
हेवा आणि नाचार करणें, रक्तमांस आटवणें.
हेवा करणाराला शंका नसते, मूर्खाला विचार नसतो.
होती आली वेळ म्हणजे गाजराचें होतें केळ.
होतील बाळ तर फेडतील काळ.
होय द्रव्यप्राप्ती मग चाळे आठवती.
होटोंसे अभी, दूधकी बों नही गयी.
होळीचे होळकर.
हौद भरे तो फवरा छुटे.

## क्ष.

क्षणशः कणश्चैव विद्यामर्थंच साधयेत्.
क्षणविध्वंसिनः काया न चिंता मरणे रणे.
क्षणिक बुद्धि त्याचें जिणें व्यर्थ.
क्षणभंगुर संसार.
क्षमावान सर्व साधतो.
क्षांतितुल्य तपोनास्ति.
क्षीणा नरा निष्करुणा भवंति.
क्षुधातुराणां न रुचिर्न पक्वं.
क्षुधेसारखा शत्रू नाहीं.
क्षुधितास अभक्ष कांहीं नाहीं.

## ज्ञ.

ज्ञानलवदुर्विदग्धं ब्रह्मापि नरं न रंजयति.
ज्ञानावांण जी जी कळा ती ती मानावी अवकळा.
ज्ञानें कांहीं फुगती, कांहीं लवती.
ज्ञानेन हीना पशुभिः समानः
ज्ञानी पंडित तुगडनर, नृप वेश्या भटपट इनसू कपट न कीजीये, इनका किया कपट.
ज्ञानी तोच पुण्यवान.
ज्ञानानें आत्मज्ञान होतें.
ज्ञात्यानें अनुमानानें परीक्षा करावी.

